ऑनलाइन आवृत्ती

संस्थापक
साने गुरुजी

# साधना

Weekly Sadhana

Date of issue
शनिवार,
२७ जून २०२०
मूल्य रु.२०
(एकूण पृष्ठे : ४४)



## जीम कॉर्बेट : वाचकांचे आसमान उंचावणारा लेखक

मनोज बोरगावकर

## मनीष सिसोदिया प्रणित (शिक्षणाचे) दिल्ली मॉडेल

संपादकीय

NIRMAN
Youth for Purposeful Life

## ११ व्या बॅचमधील प्रवेशासाठी आवाहन

# 'निर्माण' : शोध अर्थपूर्णतेचा

शिक्षण, नोकरी, निवृत्ती याहूनही वेगळं जीवनात काही असतं का?
केवळ पैसे कमावण्यापलीकडे अधिक अर्थपूर्ण जीवन शक्य आहे का?
माझ्या कौशल्यांचा व क्षमतांचा मी समाजातील प्रश्न सोडविण्यासाठी कसा उपयोग करू शकतो? महाराष्ट्रातील अस्वस्थ युवांनी याप्रश्नांच्या उत्तराचा कृतिशील शोध घ्यावा यासाठीचा उपक्रम म्हणजे **'निर्माण!'**

२००६ मध्ये डॉ. अभय आणि डॉ. राणी बंग यांनी समाजातील विविध समस्यांना आव्हान म्हणून स्वीकारू इच्छिणाऱ्या आणि अर्थपूर्ण जीवनाच्या शोधात असलेल्या युवांसाठी 'निर्माण' हा शैक्षणिक उपक्रम सुरू केला. 'नयी तालीम' या कृतीतून शिकण्याच्या शिक्षणपद्धतीवर 'निर्माण'ची ही शैक्षणिक प्रक्रिया आधारित आहे. युवकांना हेतूपूर्ण जीवन जगण्यासाठी आवश्यक मार्गदर्शन देणे, कौशल्य व पोषक वातावरण उपलब्ध करून देणे आणि अशा युवांना संघटित ठेवणं हे 'निर्माण'चे ध्येय आहे.

**१८ ते २८ वयोगटांतील भारतातील तरुण–तरुणींसाठी**

**दर सहा महिन्यात एक, अशा तीन कार्यशाळा, प्रत्येकी सुमारे ८ दिवसांच्या**

**भौगोलिक, सामाजिक आणि शैक्षणिक वैविध्य असलेल्या २०० निर्माणींचा एकत्र प्रवास**

**विचार, भावना व कृती या तीनही अंगांनी स्वत:ची रुंदी व खोली वाढविण्याचा प्रयत्न**

**समाजातील समस्यांचे प्रत्यक्ष दर्शन व त्या सोडविण्याच्या दृष्टीने विविध तज्ज्ञांसोबत चर्चा, मार्गदर्शन व कृती**

**शिबिरांचे ठिकाण : 'शोधग्राम' सर्च, गडचिरोली**

अर्थपूर्ण जीवनाचा कृतीशील शोध सुरू असणाऱ्या १४०० हून जास्त युवक-युवतींचा समुदाय म्हणजे 'निर्माण'. आतापर्यंत निर्माणच्या १० बॅचेस झाल्या आहेत व निर्माणची अकरावी बॅच येत्या वर्षात सुरू होत आहे. पुढच्या बॅचमध्ये सहभागी होऊ इच्छिणाऱ्यांनी http://nirman.mkcl.org या संकेत स्थळावरून प्रवेशअर्ज डाऊनलोड करावा आणि त्वरीत पाठवावा.



**निर्माण विषयी अधिक माहितीसाठी :**
Website: www.nirman.mkcl.org/
Facebook: www.facebook.com/nirmanforyouth/
Instagram: www.instagram.com/nirmanforyouth/
Youtube: https://www.youtube.com/user/Nirmaanites


Date of Publication : 20-6-2020

संस्थापक संपादक : साने गुरुजी
Date of issue
२७ जून २०२०
वर्ष ७२ / अंक - ४५
संपादक :
विनोद शिरसाठ
**सहयोगी संपादक मंडळ :**
अभय टिळक
अतुल देऊळगावकर
मनोहर जाधव
रझिया पटेल
मुखपृष्ठ मांडणी : **गिरीश सहस्रबुद्धे**
अक्षररचना : **सुरेश माने**
मुद्रितशोधन : **मिलिंद बोरकर**

'साधना' हे साप्ताहिक मालक, साधना ट्रस्ट यांचेसाठी प्रकाशक हेमंत नाईकनवरे यांनी मुद्रक, आनंद लाटकर कॉम्प-प्रिंट कल्पना प्रा.लि., २५/१, यशगंगा इंड. इस्टेट प्रा.लि., वडगाव बु।।, पुणे ४११०४१ येथे छापून, **साधना साप्ताहिक, ४३१ शनिवार पेठ, पुणे ४११०३०.** येथे प्रसिद्ध केले.
**Ph.: 020-24451724 /**
**Mob.: 7028257757**
weeklysadhana@gmail.com
http://weeklysadhana.in
**साधना मीडिया सेंटर (पुस्तक विक्री केंद्र)**
Ph. : 020-24459635
वार्षिक वर्गणी :
**एक वर्षासाठी : ८०० रुपये**
**दोन वर्षांसाठी : १६०० रुपये**
**तीन वर्षांसाठी : २४०० रुपये**

वर्गणीची रक्कम रोख किंवा/म. ऑ./डी. डी./चेक 'साधना साप्ताहिक' या नावाने काढून, साधना कार्यालयाकडे पाठवावी. किंवा साधना साप्ताहिक, बचत खाते **क्र.60025586634, IFSC MAHB 0000001**, **बँक ऑफ महाराष्ट्र,** बाजीराव रोड शाखा, पुणे ३० येथे वर्गणीची रक्कम जमा करावी आणि नाव, पत्ता, फोन नं. इत्यादी तपशील साधना कार्यालयाला इ-मेल अथवा फोन करून कळवावेत.



# अनुक्रम

## संपादकीय

# मनीष सिसोदिया प्रणित (शिक्षणाचे) दिल्ली मॉडेल

आठ वर्षांपूर्वी अरविंद केजरीवाल प्रणित आम आदमी पक्षाची स्थापना झाली, तेव्हा केजरीवाल यांनी लिहिलेले 'स्वराज' या नावाचे पुस्तक इंग्रजी व हिंदी भाषांमध्ये प्रकाशित झाले होते. त्याला त्यांनी आम आदमी पक्षाची तत्त्वप्रणाली संबोधले होते. महात्मा गांधी यांच्या 'हिंद स्वराज' या पुस्तकातील प्रतिपादनाचे व त्या आधारावर काही ठिकाणी झालेल्या लहान-लहान प्रयोगांचे ते अर्धे कच्चे आकलन होते. ते विस्कळीत व जंत्रीवजा स्वरूपात मांडलेले होते. त्यात या देशातील समाजजीवनातील गुंतागुंत पूर्णतः दुर्लक्षित केली होती आणि परिस्थितीचे अतिसुलभीकरण केलेले होते. त्यात दाखवलेली स्वप्ने ही स्वप्नेच राहणार होती, त्यामुळे जनसामान्यांचा मोठ्ठाच भ्रमनिरास होणार होता. म्हणून आम्ही याच संपादकीय स्तंभात त्या पुस्तकाचा समाचार घेताना, अरविंद केजरीवाल यांच्यासोबत चालणे 'ये आम् आदमी का काम नही' (साधना : डिसेंबर २०१२) असे मध्यवर्ती प्रतिपादन केले होते.

आता केजरीवाल यांचे उजवे हात समजले जाणारे मनीष सिसोदिया यांचे पुस्तक आले आहे. 'शिक्षा' या नावाने ते इंग्रजी व हिंदी या दोन्ही भाषांमध्ये उपलब्ध आहे. 'एका शिक्षणमंत्र्याने केलेले प्रयोग' असे त्याचे उपशीर्षक आहे. २०१५ ते २०१९ या काळात दिल्ली राज्याचे शिक्षणमंत्री म्हणून त्यांनी केलेल्या कामाची मांडणी या पुस्तकात आहे. या पुस्तकात महात्मा गांधी, त्यांची 'हिंद स्वराज'मधील मांडणी, त्यांची 'नई तालीम' या नावाने परिचित असलेली शिक्षणविषयक संकल्पना, या सर्वांचा पुसटसादेखील उल्लेख नाही. कोणत्याही शिक्षणतज्ज्ञाचा उल्लेख नाही. आणि तरीही हे पुस्तक सर्वसामान्य जनतेने त्यांच्यासोबत राहिले पाहिजे, असे सांगणारे झाले आहे. किंबहुना मनीष सिसोदिया शिक्षणक्षेत्रात करीत असलेल्या कामासाठी तरी आणखी एकदा आम आदमी पक्षाला दिल्लीच्या सत्तेवर बसवले पाहिजे, अशी भावना कोणाही वाचकांच्या मनात उत्पन्न करणारे झाले आहे.

जेमतेम पावणेदोनशे पानांचे हे पुस्तक कमालीचे वाचनीय झालेले आहे. सोपी व प्रवाही भाषा, सुटसुटीत मांडणी व आवश्यक तेवढेच तपशील सांगत, अधूनमधून माफक व संयत भाष्य करीत हे पुस्तक भरभर पुढे जात राहते. अरविंद केजरीवाल व आम आदमी पक्ष यांचे उल्लेख केवळ दोन-चार ठिकाणी आले आहेत आणि तेही ओझरते आहेत. दिल्लीला पूर्ण राज्याचा दर्जा नाही, नायब राज्यपालांशी सतत खटके उडत होते, केंद्र सरकारने आवश्यक ते सहकार्य केले नाही, इत्यादी प्रकारच्या तक्रारी यात अजिबात केलेल्या नाहीत. प्रशासन खूप मोठे असते, हलता हलत नाही असा सूरही कुठे आढळत नाही. भ्रष्टाचार कसा सर्वत्र बोकाळला आहे आणि तो निपटून काढण्यासाठी कशी कर्तबगारी दाखवावी लागली असेही कुठे ध्वनीत केलेले नाही. प्रचलित शिक्षणपद्धतीमुळे कसे साचलेपण येते हे सूचित केले आहे, पण फारच सौम्यपणाने. काही कायद्यांमुळे काही गोष्टी करता आलेल्या नाहीत, असे दोन-चार ठिकाणी येऊन जाते; पण त्यामुळे खूप मर्यादा आल्यात असे त्यातून पुढे येत नाही. आमूलाग्र बदल केले पाहिजेत, असेही कुठे म्हटलेले नाही आणि देशातील शिक्षणव्यवस्थेने काहीच केलेले नाही अशी तुच्छताही व्यक्त झालेली नाही.

तर मग या पुस्तकात आहे तरी काय? कोणत्याही समस्येचा मुळापासून विचार करून, तिच्याशी संबंधित सर्व घटकांच्या मर्यादा व अडचणी लक्षात घेऊन, उपलब्ध साधनसंपत्तीचा सुयोग्य वापर करून, अडथळे निर्माण झाले तर सर्जनशीलता दाखवून आणि सर्व घटकांचा सहभाग मिळवून, चिकाटीने व सातत्याने कार्यरत राहून खूप काही करता येते, हे या पुस्तकातून दिसणारे प्रतिबिंब आहे. यात नऊ प्रकरणे आहेत- अर्थसंकल्प, पायाभूत सुविधा, मुख्याध्यापक/प्राचार्य, नियमित शिक्षक, तज्ज्ञ/अतिथी शिक्षक, पालक या सहा प्रकरणांतून सध्या शिक्षणक्षेत्रात जे काही चालू आहे,

त्यात डागडुजी स्वरूपाच्या सुधारणा केल्या तरी किती फरक पडतो हे यातून दिसून येते. परस्परावलंबनाचे महत्त्व अधोरेखित करणारी जीवन विद्या, भावना समजून घेण्यास प्रवृत्त करणारे आनंदाचे तास (हॅपिनेस क्लास) आणि उद्योजकतेची मानसिकता फुलवणारा अभ्यासक्रम या तीन प्रकरणांतून, थोडी सर्जनशीलता व साहस दाखवले तर काय घडू शकते हे पाहायला मिळते. (हॅपिनेस क्लास संदर्भात विपश्यनेचे ग्लोरीफिकेशन होतेय, पण ते क्षम्य आहे.)

फेब्रुवारी २०१५ मध्ये दिल्ली राज्यातील ७० पैकी ६७ जागा असा ऐतिहासिक विजय मिळवून आम आदमी पक्ष सत्तेवर आला होता. त्याआधी मिळालेली एक संधी त्यांनी आक्रस्ताळेपणामुळे लवकर वाया घालवली होती; त्यामुळे 'पाच साल केजरीवाल' अशी घोषणा त्यांनी यावेळी दिली होती. शिक्षणक्षेत्राला आमचे सर्वोच्च प्राधान्य राहील, असे त्यांनी जाहीरनाम्यात सांगितले होते. आणि ते साहजिक होते, दिल्लीसारख्या छोट्या आणि शहरी व निमशहरी राज्यात शिक्षण, आरोग्य व अन्य पायाभूत सुविधा हेच नागरिकांचे मुख्य प्रश्न असतात. राज्य सरकारला करण्यासारखे तिथेच खरा वाव असतो. त्यातही प्राथमिक व माध्यमिक शिक्षण हा पूर्णतः राज्याच्या अखत्यारीत येणारा विषय असतो. त्यामुळे आम आदमी पक्ष सत्तेवर आल्यावर उपमुख्यमंत्री झालेल्या सिसोदिया यांच्याकडे अर्थ व शिक्षण यांच्यासह आणखी अर्धा डझन खाती होती. त्यामुळे सर्वाधिक महत्त्वाचा ठरलेला निर्णय म्हणजे राज्याच्या अर्थसंकल्पात शिक्षणखात्याच्या वाट्याला दुप्पट निधी देण्याचा निर्णय. त्याआधी १२ टक्के खर्च शिक्षणावर केला जात होता, तो यांनी २५ टक्क्यांवर आणला. आधीच्या वर्षी साडेचार हजार कोटी रुपये शिक्षण खात्याच्या वाट्याला आले होते, ते यांनी एका निर्णयानिशी नऊ हजार कोटी रुपये करून टाकले.

त्यामुळे, शाळांच्या पायाभूत सुविधा वाढवण्यासाठी, शिक्षकांच्या विशेषतः तज्ज्ञ/अतिथी शिक्षकांच्या भरतीसाठी आणि प्रशिक्षण व अन्य कामासाठी नेहमीपेक्षा दुप्पट निधी उपलब्ध होणार होता. अर्थात तो इतका जास्त नव्हता की, चंगळ करता येईल किंवा सर्व सुविधा निर्माण होतील. त्यामुळे नव्या इमारती अत्यावश्यक असतील तिथेच बांधणे, जुन्या शाळांना आवश्यक असतील तरच नव्या खोल्या बांधणे असे धोरण ठरवले. त्यामुळे पायाभूत सुविधांसाठीचा जास्तीत जास्त निधी असलेल्या इमारती व खोल्या यांची दुरुस्ती करणे, स्टाफ रूम, ग्रंथालये, प्रयोगशाळा, क्रीडांगणे, शालेय साहित्य, पाणी स्वच्छता यांची व्यवस्था करणे इत्यादींच्या वाट्याला येऊ शकला. प्रत्येक शाळेला ४ ते १४ लाख रुपये इतक्या प्रमाणात ती रक्कम उपलब्ध झाली. त्या खर्चाचे अधिकार व कामाची जबाबदारी मुख्याध्यापक व शालेय व्यवस्थापन समित्या यांच्याकडे सोपवण्यात आली.

प्रत्येक शाळेच्या मुख्याध्यापकाला पाच हजार रुपयांपर्यंत खर्च करण्याचे अधिकार होते, ते एका निर्णयानुसार पन्नास हजार रुपये केले गेले. तेव्हा 'मुख्याध्यापक एवढी जबाबदारी पेलवण्यास सक्षम नसतील', अशी शंका वरिष्ठ अधिकाऱ्याने उपस्थित केली होती. त्यावर सिसोदिया यांनी प्रश्न विचारला होता, 'जो मुख्याध्यापक १० ते २० शिक्षक आणि ५०० ते १००० विद्यार्थी सांभाळू शकतो, तो ५० हजार रुपयांचा निर्णय नीट घेऊ शकणार नाही?' असे वरिष्ठ प्रशासकीय अधिकाऱ्यांना निरुत्तर करणारे प्रश्न अनेक वेळा विचारावे लागले असणार, तसे उल्लेख पुस्तकात मात्र चार-पाच ठिकाणीच आलेत. मुख्याध्यापक हा शाळेचे नेतृत्व करीत असतो म्हणून एक हजार शाळांच्या मुख्याध्यापकांमध्ये नेतृत्वगुण विकसित व्हावेत, यासाठी मोहीमच उघडली गेली. देशातील व विदेशातील मोठ्या संस्थांना भेटी देण्यापर्यंत ती राबवण्यात आली. राज्यातील एक हजार शाळांमध्ये मिळून २० हजार पूर्णवेळ नियमित शिक्षक होते, त्यांचे प्रशिक्षण हा दुसरा टप्पा होता. त्यांच्या जोडीला प्रत्येक पाच शाळांमागे फिरता असा एक अतिथी व तज्ज्ञ शिक्षक देण्यात आला.

मुख्याध्यापक व शिक्षक यांच्याकडील अतिरिक्त काम काढून घेण्यात आले किंवा कमी करण्यात आले, त्यासाठी इतर नियुक्त्या केल्या. शालेय व्यवस्थापन समित्या बळकट करण्यात आल्या, त्यासाठी गोपनीय पद्धतीने मतदान करून निवडणुका घेण्यात आल्या. पालक, शिक्षक व विद्यार्थी यांचे एकत्रित मेळावे व्हावेत, यासाठी प्रत्येक तीन महिन्यांतून एक दिवस निश्चित करण्यात आला; त्यासाठी सार्वत्रिक सुट्टी देऊन, प्रशासन व माध्यमे यांचा वापर करून जय्यत तयारी करण्यात आली. या सर्व प्रकियेत विद्यार्थी, पालक, शिक्षक या तिन्ही घटकांचा आत्मसन्मान जपला जावा, त्यांचा उत्साह वाढावा, त्यांना ओझे वाटू नये, काम आनंददायी व्हावे, यासाठी अनेक बारीक तपशील लक्षात घेण्यात आले.

या पुस्तकातील शेवटची तीन प्रकरणे शिक्षणपद्धतीत गृहित असलेल्या, पण औपचारिकता म्हणून राहिलेल्या संकल्पना प्रत्यक्षात उतरवल्यावर काय घडू शकते ते दाखवतात. यातील जीवन विद्या शिबिरे शिक्षकांसाठी व अधिकाऱ्यांसाठी होती, काही वेळा एकेक दिवसांची, काही वेळा आठआठ दिवसांची. त्यात शिक्षण या संकल्पनेचा मूलभूत विचार करणे हा भाग होता. म्हणजे मुले-मुली कशी शिकत जातात, त्यांची मानसिकता कशी घडत जाते, शिक्षणाचा मूळ हेतू काय आहे, शिक्षण म्हणायचे कशाला इत्यादी प्रश्नांची मांडणी, आखणी, दुरुस्ती असे बरेच काही होते. आनंदाचे तास (हॅपिनेस क्लास) हा प्रकार बालवाडी ते आठवी या वर्गातील (आठ लाख) विद्यार्थ्यांसाठी सुरू केले गेले. रोज एक तास यासाठी ठरवण्यात आला. त्या तासाला विद्यार्थ्यांसाठी पाठ्यपुस्तक जाणीवपूर्वक ठेवले नाही. आत्मनिरीक्षण आणि अभिव्यक्ती हे दोन मुख्य हेतू समोर ठेवून त्यासाठी सर्वसाधारण रूपरेषा आखून देण्यात आली. भावनिक संतुलन निर्माण होण्यास भरपूर वाव राहील असा प्रयत्न करण्यास सांगितले गेले. आणि उद्योजकतेची मानसिकता रुजविण्यासाठी नववी ते बारावी या वर्गातील (सहा लाख) विद्यार्थी समोर ठेवण्यात आले. तिथे उद्योजक निर्माण करण्यासाठी हा अभ्यासक्रम आहे, असा अर्थ सर्व स्तरावर निघू लागलाय आणि त्याचा नकारात्मक परिणाम (आमच्या मुलांना उद्योग व व्यापार करायचाच नाहीये, त्यांना अधिकारी/ वैज्ञानिक व्हायचे आहे वगैरे तक्रारी) सुरुवातीलाच दिसू लागल्यावर ते सावध झाले. मग उद्योग करा अथवा करू नका, ती मानसिकता कशी प्रत्येक क्षेत्रात आवश्यक असते हा मुद्दा अधोरेखित करून तो अभ्यासक्रम आखण्यात आला.

'शिक्षा' या पुस्तकात मनीष सिसोदिया यांनी वरील चौकटीत सरकारी प्राथमिक, माध्यमिक शाळांसाठी भरपूर काम केले आहे, ते स्वतः पूर्णतः त्या प्रक्रियेत मनापासून सहभागी झाल्याशिवाय ते शक्य झाले नसते. त्यांचे वडील सरकारी शाळेत शिक्षक होते, याचा काहीएक प्रभाव त्यांच्यावर असणार. शिवाय काही वर्षे पत्रकारितेत वावरलेले असल्याने शिक्षण प्रक्रियेकडे त्यांचे कायम लक्ष असणार. अरुणा रॉयप्रणित 'माहिती अधिकार कायद्या'साठी झालेले आंदोलन आणि नंतर अण्णा हजारे व केजरीवालप्रणित लोकपाल निर्माण करण्यासाठीचे आंदोलन, या दोन्ही प्रक्रियेत मनीष सिसोदिया होते. त्यामुळे, त्यातून आकाराला आलेले मन व विचार घेऊन ते जेव्हा दिल्लीचे शिक्षणमंत्री झाले तेव्हा कार्यवाहीची संधी त्यांना मिळाली. त्यांनी ती संधी घेतली, व्यवस्थेला शिव्या-शाप देण्यात वेळ व ऊर्जा दवडली नाही. परिणामी प्राप्त परिस्थितीतही त्यांना खूप जास्त काम करता आले आहे. आणि तरीही त्यांचे पाय जमिनीवर आहेत, हे त्यांचे पुस्तक वाचताना पानोपानी जाणवते. पुस्तकाच्या अखेरीस त्यांनी समारोपाचे जे प्रकरण लिहिले आहे त्याला त्यांनी, 'ही तर सुरुवात आहे' असे शीर्षक दिले आहे. साडेचार वर्षे कामावर आधारित हे पुस्तक दिल्ली विधानसभा निवडणुका आल्या तेव्हा प्रकाशित झाले. फेब्रुवारी २०२० मध्ये झालेल्या दिल्ली विधानसभा निवडणुकीतही आम् आदमी पक्षाला ७० पैकी ६३ जागा मिळाल्या आणि पुन्हा सत्ता मिळाली. त्यात सिसोदिया यांनी शिक्षणक्षेत्रात केलेल्या कामाचा मोठा वाटा असणारच. म्हणजे मागील साडेपाच वर्षे ते शिक्षणमंत्री आहेत, अगदीच काही अनपेक्षित घडले नाही तर पुढील साडेचार वर्षे त्या पदावर राहतील. उर्वरित काळात त्यांच्या मनात असलेल्या (समारोप प्रकरणात आलेल्या) तीन विद्यापीठांच्या कल्पना प्रत्यक्षात येतीलही कदाचित. शिक्षक प्रशिक्षण, क्रीडा आणि उपयोजित विज्ञान या तीन आघाड्या सांभाळणारी तीन विद्यापीठे अशी ती कल्पना आहे.

हे पुस्तक वाचत असताना आणि वाचून झाल्यावर एक विचार सारखा मनात घोळत राहतो तो असा की, प्रचलित व्यवस्थेतही छोट्या-छोट्या सुधारणा करीत काम करायला चिक्कार वाव आहे आणि त्यासाठीच्या कार्यवाहीसाठी हीच दिशा सर्वार्थाने योग्य आहे. त्यामुळे, मनीष सिसोदियाप्रणित, शिक्षणाचे दिल्ली मॉडेल हे नवे नाही, अपरिचित तर नाहीच नाही. किंबहुना हे मॉडेल अन्य कोणत्याही क्षेत्राला लागू करता येईल. आरोग्य, शेती, उद्योग इत्यादी क्षेत्रांतही याच पद्धतीने विचार करून काम करता येईल. विज्ञान या संकल्पनेचा खूपच संकुचित अर्थ आपल्याकडे घेतला जातो, पण खऱ्या व व्यापक अर्थाने विचार केला तर यालाच वैज्ञानिक पद्धतीने काम करणे असेही म्हणता येईल. अर्थात, मनीष सिसोदिया यांनी केलेल्या या कामासाठी त्यांना बऱ्याच अनुकूलता होत्या. प्रचंड बहुमत असलेले सरकार, खंबीर पाठराखण करणारा डायनॅमिक असा मुख्यमंत्री, स्वतःकडेच अर्थ व अन्य काही महत्त्वाची खाती असणे आणि अगदीच छोटे राज्य, यामुळे त्यांना हे करता आले. पण तसे म्हणून, त्यांच्या कामाचे महत्त्व कमी करता येणार नाही. 'तेवढी अनुकूलता नसल्याने आम्हाला तसे करता येणार नाही' असे कोणी म्हणणार असेल तर त्याकडे सहानुभूतीने पाहता येणार नाही. प्राप्त परिस्थितीत खूप काही करायला वाव असतो, व्यक्तीला, अधिकाऱ्याला, संस्थेला, संघटनेला आणि सरकारलाही हाच या पुस्तकातून पुढे येणार निष्कर्ष आहे...!

न्यायदेवतेच्या
(न लिहिलेल्या) डायरीतून

प्रतापसिंह साळुंके

# पासष्टाव्या घरातील स्वामी

राज्यपालाचे एक स्वतंत्र पासष्टावे घर असते आणि ते पटावर नाही, तर त्या पटापेक्षा उच्च स्थानावर असते. तो बुद्धिबळाचा डाव त्याच्या नियमांप्रमाणे खेळला जातोय ना, हे पाहणाऱ्या निष्पक्ष आणि निःस्पृह न्यायाधीशाचे ते स्थान असते. न्यायालयातील न्यायाधीशापेक्षा हा न्यायाधीश वेगळा असतो. न्यायालयातील न्यायाधीशाकडे आपण एखादे गैरकृत्य झाल्यानंतर जातो. इथे राज्यपाल असा न्यायाधीश असतो, जो लोकशाहीच्या पटावर गैरकृत्य होऊच नये म्हणून अखंडपणे पहारा देत असतो. राज्यातला हा कारभार आपल्या नावाने चालविला जातो– म्हणजे आपण स्वामी आहोत, कुणी तरी नियुक्ती करून उपकृत केलेले कृपाभिलाषी नाही, हे या पदावरील व्यक्तींनी लक्षात घेणे गरजेचे आहे. राज्यघटनेचे कलम १५९ नुसार राज्यपाल जी शपथ घेतात, ती ‘संविधानाच्या रक्षणाची’ असते; नियुक्त करणाऱ्या राजकीय पक्षाच्या राजकीय भूमिकेच्या रक्षणाची नाही.

दि.२३ नोव्हेंबर २०१९ रोजीची पहाट महाराष्ट्रात एक अनोखे आश्चर्य घेऊन आली होती. जवळपास एक महिना चाललेल्या सत्तानाट्यामध्ये सर्वांना आश्चर्यचकित करणाऱ्या घडामोडी घडल्या होत्या. ज्या अजित पवारांवर आणि राष्ट्रवादी पक्षावर सिंचन घोटाळ्याचे गंभीर आरोप भारतीय जनता पक्षाने विरोधी पक्षात व सत्तेत असताना केले होते, त्यांच्याबरोबर देवेंद्र फडणवीस यांनी सकाळी ७.४५ वाजता शपथ घेतली. त्याअगोदर झी वाहिनीवरील ‘रात्रीस खेळ चाले’ या लोकप्रिय मालिकेचे शीर्षक सार्थ ठरवत केंद्र सरकार, राष्ट्रपती, महाराष्ट्राचे राज्यपाल यांनी जी तत्परता दाखविली, ती तर चक्रावून टाकणारी होती. दि.२२ नोव्हेंबरच्या रात्री आठ वाजता सत्तास्थापनेच्या प्रक्रियेला सुरुवात झाली. रात्री ११ वाजता राज्यपालांना सत्तास्थापनेचे पत्र देण्यात आले, तर २३ नोव्हेंबरच्या मध्यरात्री १२ वाजता राज्यपाल भगतसिंह कोश्यारी यांनी राष्ट्रपती राजवट उठविण्याची शिफारस केली. पहाटे १ वाजता केंद्र सरकारने राष्ट्रपती राजवट उठविण्यासाठी मंजुरी दिली. पहाटे ५.४७ वाजता राष्ट्रपती राजवट उठविण्याची अधिसूचना जारी केली गेली. लोककल्याणासाठी दिवसरात्र तत्परतेने झटणारे केंद्र सरकार, राष्ट्रपती आणि राज्यपाल यांची ‘मेहनत’ पाहून महाराष्ट्रासह देशातील जनतेचा ऊर भरून आला होता. राज्यस्थापनेसाठी दाखविलेली हीच ‘लवचिकता’, ‘तत्परता’ आणि ‘चिकाटी’ याची प्रचिती सर्वसामान्य माणसांचे प्रश्न सोडविण्याच्या कामी मात्र कुठे गायब झालेली असते, हा प्रश्न सर्वसामान्यांच्या मनात सहज तरळून गेला. या प्रकरणात राष्ट्रपती आणि राज्यपाल निष्पक्षपणे वागले, असे ठामपणे म्हणता येईल?

मे २०१८ मध्ये कर्नाटकात काँग्रेस आणि जनता दल (सेक्युलर) यांची निवडणुकीचा निकाल लागल्यानंतरची युती ही राज्य सरकार बनविण्यासाठी लागणाऱ्या बहुमताचा आकडा पार करणारी असूनही त्यांना संधी न देता बहुमत नसणाऱ्या बी.एस. येडियुरप्पा यांना सरकार बनविण्यासाठी बोलावले गेले. त्या वेळी कर्नाटकचे राज्यपाल वजुभाई वाला यांच्या निष्पक्ष असण्याबद्दल प्रश्न उपस्थित केले गेले. नोव्हेंबर २०१८ मध्ये जम्मू-काश्मीरमध्ये

पी.डी.पी.च्या नेत्या व माजी मुख्यमंत्री मेहबूबा मुफ्ती यांनी काँग्रेसच्या पाठिंब्याचे पत्र राज्यपाल सत्यपाल मलिक यांना पाठविले, परंतु असे कुठलेही पत्र आपल्याला मिळाले नसल्याचा दावा राज्यपालांनी केला. राजभवनात फॅक्स मशीन नादुरुस्त असल्याचे हास्यास्पद व एखाद्या राजकारण्याला शोभेल असे चमत्कारिक कारण राज्यपालांनी दिले होते आणि राज्यात राष्ट्रपती राजवट लागू करण्याची शिफारस राज्यपालांनी राष्ट्रपतींकडे केली होती. फॅक्स मशीन नादुरुस्त असल्याने राष्ट्रपती राजवट लागू होण्याची किंमत भारतीय लोकशाहीने दिल्याचे आपण पाहिले. याच सत्यपाल मलिक यांनी ऑक्टोबर २०१८ मध्ये श्रीनगरच्या महापौर कोण बनू शकतो, याविषयी अप्रत्यक्षपणे त्याचे नाव सुचवून 'जर तो महापौर झाला तर पी.डी.पी. आणि काँग्रेस यांच्यासाठी तो त्रासदायक ठरू शकतो' असे वक्तव्य केल्याचे वृत्त एनडीटीव्हीने प्रसारित केले होते. याच महोदयांनी काश्मीरच्या राज्यपालांना काहीच काम नसल्याने ते मद्यपान करतात किंवा गोल्फ खेळतात, असे धक्कादायक विधान मार्च २०२० मध्ये केले होते. सत्यपाल मलिक यांनी राज्यपालपदाची शोभा वाढविली की शोभा केली, हा प्रश्न अनेक भारतीयांच्या मनात आहे.

नोव्हेंबर २०१८ मध्ये मेघालयाचे राज्यपाल तथागत रॉय यांनी मुंबईवरील दहशतवादी हल्ल्याच्या दहाव्या स्मृतिदिनी या हल्ल्यात मुस्लिम व्यक्तींना इजा झाली नाही, कारण हा हल्ला पाकिस्तानपुरस्कृत होता, असे अत्यंत हीन वक्तव्य केले होते. त्रिपुराचे मुख्यमंत्री विप्लव देव यांनी महाभारतकाळात इंटरनेट असल्याचा जावईशोध लावल्यावर त्यांच्यावर चोहोबाजूंनी टीका झाल्यानंतर मुख्यमंत्र्यांच्या वक्तव्याचे समर्थन याच महोदयांनी केले होते. या वेळी आपण एक लक्षात घेतले पाहिजे की– वैज्ञानिक दृष्टिकोन समाजात रुजविण्यासाठी प्रयत्न करणे, हे भारतीय संविधानाने प्रत्येक नागरिकाचे मूलभूत कर्तव्य मानले आहे. तथागत रॉय यांच्या वागण्यातून संविधानाचा सन्मान होत होता की अपमान, हा प्रश्न भारतीय नागरिकांच्या मनात होता.

अरुणाचल प्रदेशाचे राज्यपाल जे.पी. राजखोवा यांनी २०१६ मध्ये अरुणाचल प्रदेश विधानसभेच्या अधिवेशनात हस्तक्षेप करून नबाम तुकी यांच्या बहुमत चाचणीसंदर्भात अतिशय धक्कादायक निर्णय घेतला होता. विधानसभेचे पाचवे अधिवेशन २१ ऑक्टोबर २०१५ रोजी संपले होते. दि.३ नोव्हेंबर २०१५ रोजी राज्यपालांनी विधानसभेचे सहावे अधिवेशन १४ जानेवारी २०१६ रोजी होईल, असा आदेश जारी केला. मधल्या काळात काँग्रेस आमदारांनी विधानसभा उपाध्यक्ष, तर भाजप आमदारांनी विधानसभा अध्यक्षांना आपल्या पदावरून हटविण्याची मागणी केली. दि.९ डिसेंबर २०१५ रोजी राज्यपालांनी विधानसभेचे आगोदर जाहीर केलेले सहावे अधिवेशन १४ जानेवारी २०१६ वरून १६ डिसेंबर २०१५ वर आणत असल्याचा आदेश दिला. दि.१६ डिसेंबर २०१५ रोजी तुकी सरकारमधील आमदारांनी विधानसभेचे दरवाजे आतून बंद केले. भाजप आमदारांनी एका हॉटेलमध्ये अधिवेशन घेऊन दुसऱ्या व्यक्तीची मुख्यमंत्री म्हणून निवडही केली. ही निवड केली त्यावेळी अगोदरचे मुख्यमंत्रीही आपल्या पदावर कार्यरत होते. भारतीय लोकशाहीच्या इतिहासात एकाच वेळी एखाद्या राज्याला दोन मुख्यमंत्री असल्याचा दुर्मिळ सोहळा जनतेने पाहिला. जुलै २०१६ मध्ये सर्वोच्च न्यायालयाने अरुणाचलच्या राज्यपालांनी आपल्या अधिकाराचा गैरवापर केला तसेच विधानसभा अध्यक्षाच्या कार्यक्षेत्रात हस्तक्षेप केल्याचा निर्वाळा दिला. एखाद्या राज्यपालाच्या कार्यशैलीबद्दल सर्वोच्च न्यायालयाने इतक्या स्पष्ट शब्दांत मतप्रदर्शन करण्याची आणि राज्यपालाने केलेल्या कृती कायद्याच्या चौकटीत बसत नसल्याने ती रद्दबातल ठरविण्याची ही घटना अपवादभूत असली तरी सर्वोच्च सांविधानिक पदावरील व्यक्तींचे वर्तन किती आक्षेपार्ह आणि गंभीर वळणावर जात असल्याचे या खटल्याच्या निमित्ताने आपल्यासमोर आले.

राष्ट्रपती किंवा राज्यपाल यांच्या निर्णयावर टीका, गदारोळ होण्याचे प्रसंग काही एवढ्यावरच थांबत नाहीत. बिझिनेस स्टँडर्ड या प्रथितयश दैनिकात २१ मे २०१८ रोजी मानसी जयस्वाल यांच्या 'हिअर इज अ टाइम लाईन ऑफ काँट्रोव्हर्सियल डिसिजन्स बाय ऑनरेबल गव्हर्नर्स' या लेखात १९५२ पासून २०१८ पर्यंतच्या कालपटातील राज्यपालांच्या विवादास्पद निर्णयांवर भाष्य केले आहे.

१९५२ मधील पहिल्या सार्वत्रिक निवडणुकीपासूनच राज्यपालांच्या निर्णयावर प्रश्नचिन्ह उमटायला सुरुवात झाली होती. मद्रास राज्याचे राज्यपाल सी.प्रकासा यांनी १९५२ मध्ये काँग्रेसचे सी. राजगोपालाचारी यांना सरकार बनविण्यासाठी पाचारण केले होते. विशेष म्हणजे

सी.राजगोपालाचारी ना निवडून आले होते, ना त्यांनी निवडणुकीत भाग घेतला होता. मग कशाच्या जोरावर राज्यपालांनी सी.राजगोपालाचारी यांना पाचारण केले, हा प्रश्न अजूनही अनुत्तरितच आहे. केरळमधील मुख्यमंत्री ई.एम.एस.नंबुद्रिपाद यांचे सरकार बरखास्त करावे, असा अहवाल केरळचे राज्यपाल बुरगुला रामकृष्णा राव यांनी १९५९ मध्ये दिला होता. त्या अहवालासाठी कमाल जमीनधारणा कायदा विधेयक व शिक्षणक्षेत्राशी संबंधित एक विधेयक अशा दोन विधेयकांवरून मोठ्याा प्रमाणात झालेली निदर्शने व आंदोलने ही कारणे दिली होती. राज्यपालांच्या अहवालाच्या आडून उदारमतवादी पंडित जवाहरलाल नेहरू यांनी केरळात असलेले हे बिगरकाँग्रेसी सरकार बरखास्त केले असा जो आरोप केला जातो, त्या आरोपाचा प्रतिवाद फारसा प्रभावीपणे समोर आलेला नाही. कायद्याचे काही अभ्यासक असेही सांगतात की, पंडित जवाहरलाल नेहरू यासाठी सुरुवातीला तयार नव्हते; परंतु त्यांच्या कन्या इंदिरा यांनी हे डावे सरकार बरखास्त करावे, यासाठी पडद्यामागून हालचाली केल्या होत्या. सत्य आता काळाच्या पोटात गडप झाले आहे. अर्थात, त्याची जबाबदारी मात्र पंतप्रधान आणि राष्ट्रपती यांना झटकता येणार नाही, हेही तितकेच खरे. याही प्रकरणात राज्यपालांचा अहवाल प्रश्नांकित होता.

मार्च १९७० मध्ये पश्चिम बंगालचे मुख्यमंत्री अजोय घोष यांनी मुख्यमंत्रिपदाचा राजीनामा दिल्यानंतर मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्षाचे नेते ज्योती बसू यांनी पश्चिम बंगालचे राज्यपाल शांतिस्वरूप धवन यांच्याकडे सरकार स्थापन करण्यासाठी लागणारे आणि विश्वासदर्शक ठराव संमत करण्यासाठी आवश्यक असणारे संख्याबळ असल्याचाही दावा केला होता. खरे तर राज्यपालाने स्थिर सरकार स्थापण्यासाठी जे उपलब्ध पर्याय असतील, त्यापैकी सर्वोत्तम पर्यायाची निवड आपला विवेकाधिकार वापरून करावी, असा संकेत आहे. परंतु या सांविधानिक संकेताकडे आणि सत्तास्थापनेच्या दाव्याकडे साफ दुर्लक्ष करून पश्चिम बंगालमध्ये राष्ट्रपती राजवट लागू करण्याची शिफारस राज्यपालांनी केली होती. राज्यामध्ये स्थिर सरकार स्थापले जाण्याची शक्यता न अजमावता थेट राष्ट्रपती राजवट लागू करण्याने कुठल्या लोकशाही मूल्यांचे संवर्धन राज्यपाल महोदय करत होते, हा प्रश्न लोकांच्या मनात आजही आहे. हरियानात लोकदल व भाजप यांच्या युतीचे नेते आणि मुख्यमंत्रिपदाचे दावेदार देवीलाल यांच्या सत्तास्थापनेच्या दाव्याकडे १९८२ मध्ये दुर्लक्ष करून काँग्रेसचे भजनलाल यांना सत्तास्थापनेसाठी पाचारण करण्यात आले होते. देवीलाल यांचा दावा नाकारून भजनलाल यांचा दावा मान्य करण्यासाठी राज्यपाल गणपतराव तापसे यांनी काय निकष लावला होता, हा प्रश्न आजही अनुत्तरित आहे.

आंध्र प्रदेशमध्ये पहिले बिगरकाँग्रेस सरकार १९८३ मध्ये स्थापन झाले होते. आंध्र प्रदेशचे मुख्यमंत्री एन.टी. रामहराव हे हृदयशस्त्रक्रियेसाठी १९८४ मध्पे अमेरिकेला गेले असताना राज्याचे अर्थमंत्री नंदेदला भास्करा राव यांनी बंड करून काँग्रेसच्या एका गटाला सोबत घेऊन सत्तास्थापनेचा दावा केला. ते आंध्र प्रदेशाचे नवे मुख्यमंत्री बनले. नंदेदला यांच्या या सगळ्या कृतींबाबत लक्षात घेण्यासारखी बाब म्हणजे, ते पूर्वाश्रमीचे काँग्रेसवासी होते आणि काँग्रेसने नियुक्त केलेले राज्यपाल रामलाल यांच्याशी त्यांचे 'स्नेहपूर्ण' संबंध होते. कर्नाटकमध्ये कर्नाटक जनता दलाचे एस.आर. बोम्मई यांनी त्यांना सत्तास्थापनेसाठी आवश्यक असलेल्या संख्याबळाचा दावा १९८८ मध्ये करून त्यांच्या नेतृत्वाबाबत आपल्या पक्षाचा अधिकृत ठराव राज्यपाल पी. वेंकटसुबैय्या यांना सादर करूनही त्यांचा सत्तास्थापनेचा दावा अमान्य करण्यात आला होता. या प्रकरणातही राज्यपालांनी मुख्यमंत्रिपदाचे दावेदार एस.आर. बोम्मई यांचा दावा मान्य करून त्यांना सत्तास्थापनेची संधी देणे, संविधान आणि व्यवहाराला धरून असताना त्यांचा दावा कशाच्या जोरावर नाकारला, हे कळायला मार्ग नाही. गोव्याचे राज्यपाल भानू प्रतापसिंग यांनी तर १९९४ मध्ये कहरच केला होता. मुख्यमंत्री विल्फ्रेड डिसुझा यांचे सरकार बरखास्त करून रवी नाईक यांची मुख्यमंत्री म्हणून निवडही केली होती. यासाठी दिलेले कारणही अतार्किक होते. विल्फ्रेड डिसुझा यांच्या मंत्रिमंडळातील पाच मंत्र्यांनी राजीनामा दिला, एवढ्या कारणावरून सरकार बरखास्त केले. खरे तर पाच मंत्र्यांचे राजीनामे आल्यानंतर राज्य सरकार लगेचच अल्पमतात आल्याचा निष्कर्ष कशाच्या आधारावर काढला? ते एक कोडेच आहे, कारण पाच मंत्र्यांनी राजीनामे दिल्यानंतरही सरकार बहुमतात असू शकते. बहुमत चाचणीशिवाय सरकार अल्पमतात आले असल्याचा निष्कर्ष काढणे अयोग्य असले तरी 'राजकीय सोय' पाहून तसा तो काढला गेल्याचे अनेक दाखले पाहायला मिळतात. असेही

सांगितले जाते की, राज्यपालांच्या या सगळ्या 'पराक्रमाबाबत' केंद्र सरकार व राष्ट्रपती हेही अनभिज्ञ होते. राज्यातील घडामोडी सामान्य माणसांसारख्या त्यांनाही माध्यमातून त्याच्या बातम्या प्रसिद्ध झाल्यावरच कळाल्या.

गुजरातमध्ये भाजपचे सुरेश मेहता मुख्यमंत्री असताना त्यांच्याच पक्षातील शंकरसिंह वाघेला आणि इतर ४० आमदार यांनी बंडखोरी केल्यामुळे सरकारचे भवितव्य १९९६ मध्ये अधांतरी झाले. गुजरातचे राज्यपाल कृष्णपालसिंग यांनी सुरेश मेहता यांना विधानसभेत आपले बहुमत सिद्ध करण्यास सांगितले. सुरेश मेहता यांनी आपले बहुमत सिद्धही केले, तरीही राज्यपालांनी 'राज्यात राष्ट्रपती राजवट लागू करण्यात यावी' असा अहवाल दिला. राज्य सरकार बहुमतात असल्याचे बहुमत चाचणीतून सिद्ध झाल्यानंतरही राज्यात राष्ट्रपती राजवट लागू करावी, हा अहवाल कशाच्या आधारावर दिला गेला याचे उत्तर मिळत नाही. या अहवालाच्या आधारे राज्यात राष्ट्रपती राजवट लागू करण्यात आली होती. त्या वेळी अनेक पक्षांचा पाठिंबा असलेल्या आघाडी सरकारचे नेतृत्व एच.डी. देवेगौडा करत होते. हा उल्लेख यासाठी महत्त्वाचा की, सत्तेचा गैरवापर एकाच पक्षाचे बहुमतातले सरकार करते असा गैरसमज दूर व्हावा. आणि अनेक पक्षांचा पाठिंबा सरकारला असल्यानंतर तरी केंद्रीय मंत्रिमंडळाच्या माध्यमातून राष्ट्रपती आणि राज्यपाल यांच्या आडून सत्तेचा दुरुपयोग करण्यात अडथळे येवू शकतात हा 'भाबडा आशावाद' किती व्यर्थ ठरतो हे लक्षात यावे.

फेब्रुवारी १९९८ मध्ये उत्तर प्रदेशात भाजपचे कल्याणसिंह मुख्यमंत्री असताना लोकतांत्रिक काँग्रेस आणि जनता दल पक्षाच्या आमदारांनी सरकारचा पाठिंबा काढल्यामुळे ते अल्पमतात आले होते. उत्तर प्रदेशचे राज्यपाल रोमेश भंडारी यांनी लोकतांत्रिक काँग्रेस पक्षाचे जगदंबिका पाल यांची मुख्यमंत्रिपदी निवड केली होती. जगदंबिका पाल यांच्याकडे सत्तास्थापनेसाठी लागणारे बहुमत असल्याचा राज्यपालांचा निष्कर्ष विवादास्पद होता. जगदंबिका पाल यांच्या निवडीला सर्वोच्च न्यायालयात आव्हान देण्यात आले होते. सर्वोच्च न्यायालयाने राज्यपालांचा लोकतांत्रिक काँग्रेस पक्षाचे जगदंबिका पाल यांची मुख्यमंत्रिपदी निवड करण्याचा निर्णय रद्दबातल ठरवून कल्याणसिंह यांची मुख्यमंत्री म्हणून पुन्हा नियुक्ती करण्याचे आदेश दिले. एखाद्या राज्यपालाने घेतलेला निर्णय संविधानाच्या चौकटीबाहेर असल्याने तो रद्दबातल ठरविण्याची वेळ न्यायालयावर येणे, हे लोकशाहीच्या दृष्टीने दुर्दैवी होते.

बिहारमध्ये जनता दल (संयुक्त) आणि भाजप यांनी संयुक्तपणे सत्तास्थापनेचा दावा २००५ मध्ये केला होता. २४३ सदस्यसंख्येपैकी ११५ आमदारांचा आपल्या संयुक्त सरकारला पाठिंबा असल्याचा दावा करण्यात आला होता. परंतु राज्यपाल बुटासिंग यांनी बिहार विधानसभा बरखास्त करून राष्ट्रपती राजवट लागू करण्यात यावी, असा अहवाल राष्ट्रपतींकडे पाठविला होता. याच वर्षी झारखंडमध्ये राष्ट्रीय लोकशाही आघाडीने विधानसभेच्या ८० सदस्यांपैकी ४१ सदस्यांचा आपल्याला पाठिंबा असल्याचे नमूद करून सत्तास्थापनेचा दावा केला होता, परंतु राज्यपाल सैद सिबते राझी यांनी झारखंड मुक्ती मोर्चाचे शिबू सोरेन यांची मुख्यमंत्री म्हणून नियुक्ती केली. हे प्रकरण सर्वोच्च न्यायालयात गेले. सर्वोच्च न्यायालयाने शिबू सोरेन यांना बहुमत सिद्ध करण्याचे आदेश दिले. सोरेन यांना बहुमत सिद्ध करता आले नाही. परिणामी, राष्ट्रीय लोकशाही आघाडीचे नेते अर्जुन मुंडा यांची मुख्यमंत्रिपदी नियुक्ती करण्यात आली. एखाद्या पक्षाने सत्ता स्थापन करावी वा करू नये, याबाबत राज्यपालांनी पक्षपाती असू नये. राज्याला जो स्थिर सरकार देऊ शकतो, त्या पक्षाला सरकार स्थापन करण्याची संधी द्यावी, असा संकेत आहे. त्याचे पालन होत नसल्याचे सांविधानिक इतिहासात अनेक वेळा पाहायला मिळते.

सप्टेंबर २०१० मध्ये कर्नाटकात मुख्यमंत्री बी.एस. येडियुरप्पा यांच्याविरोधात १६ आमदारांनी बंडखोरी केली. विधानसभे मध्ये (कर्नाटक विधानसभा) बहुमत चाचणी घेण्यात आली. विधानसभेचे अध्यक्ष के.जी.बोपिह यांनी १६ बंडखोर आमदारांना अपात्र ठरविले आणि आवाजी मताने बहुमत सिद्ध केले. अशा प्रकारे आवाजी मतदानाने बहुमत सिद्ध करण्याच्या पद्धतीवरून खूप गदारोळ झाला होता. विधानसभा अध्यक्षांनी अशा पद्धतीने बहुमत सिद्ध करण्यासंदर्भात सर्वोच्च न्यायालयाने अतिशय तीव्र शब्दांत आपली नापसंती व्यक्त केली होती. राज्यपाल यू.आर. भारद्वाज यांनी राष्ट्रपतींना या सगळ्या प्रकरणासंदर्भात पत्र लिहून कळविले. या पत्रामध्ये राज्यात राष्ट्रपती राजवट लागू करावी, अशी मागणी केली. परंतु केंद्रीय मंत्रिमंडळाने हे प्रकरण राष्ट्रपती राजवट लागू करण्यायोग्य नसल्याचे नमूद

केले. कर्नाटकचे राज्यपाल स्थानिक राजकारणात अधिक रस घेऊन मर्यादाभंग करत असल्याच्या तक्रारी या निमित्ताने केल्या जात होत्या.

मार्च २०१६ मध्ये उत्तराखंड राज्यात काँग्रेसच्या ९ व भाजपच्या २६ आमदारांनी काँग्रेसचे मुख्यमंत्री हरीश रावत यांच्याविरुद्ध बंडखोरी केली. विधानसभा अध्यक्षांनी बंडखोर आमदारांना अपात्र ठरविले. राज्यपाल के.के. पॉल यांनी राष्ट्रपतींना राज्यात राष्ट्रपती राजवट लागू करण्याची शिफारस केली. केंद्र सरकारने राज्यपालांच्या अहवालाचा आधार घेत, राज्यातील अस्थिरतेचा फायदा घेऊन आपल्या पक्षाचे सरकार स्थापन करता यावे यासाठी 'अर्थपूर्ण व्यवहार' अधिक सुलभतेने करता येण्यासाठी राष्ट्रपती राजवट लागू केली. या राजवटीला उत्तराखंड उच्च न्यायालयात आव्हान देण्यात आले. या खटल्याचा निकाल अभूतपूर्व असा आहे. उत्तराखंड उच्च न्यायालयाचे मुख्य न्यायमूर्ती के.एम. जोसेफ यांनी अतिशय निःसंदिग्ध शब्दांत आणीबाणीच्या सांविधानिक तरतुदी 'राजकीय संधिसाधूपणा' करण्याचे साधन बनू देऊ नयेत, असा निर्वाळा देऊन हरीश रावत यांच्या सरकारची पुनर्स्थापना केली. उत्तराखंड उच्च न्यायालयाचे मुख्य न्यायमूर्ती के.एम. जोसेफ यांना या निकालाची मोठी किंमत द्यावी लागणार, अशी परिस्थिती निर्माण झाली होती. जानेवारी २०१८ मध्ये पाचसदस्यीय न्यायवृंदाने न्यायमूर्ती के.एम. जोसेफ यांची सर्वोच्च न्यायालयाचे न्यायाधीश म्हणून नियुक्ती करण्यासाठी एकमताने शिफारस केली होती, परंतु उत्तराखंड विधानसभा बरखास्त करण्याचा केंद्र सरकारचा निर्णय रद्दबातल ठरविणारे न्यायमूर्ती सर्वोच्च न्यायालयात नियुक्त होऊ नयेत, म्हणून केंद्र सरकारने जंग-जंग पछाडले. कायदामंत्री रविशंकर प्रसाद यांनी सरन्यायाधीशांना पत्र लिहून या शिफारशीवर प्रश्न उपस्थित करण्याचा निकराचा प्रयत्न करून पाहिला. न्यायमूर्ती के.एम. जोसेफ हे अखिल भारतीय सेवाज्येष्ठतेमध्ये ज्येष्ठ ठरत नाहीत इथपासून ते केरळ राज्यातील जास्त न्यायमूर्ती सर्वोच्च न्यायालयात असल्याने आता दुसऱ्या राज्यातील न्यायमूर्तींचा विचार करावा, इथपर्यंत युक्तिवादाचा लंबक नेऊन पाहिला. परंतु न्यायवृंदाने जुलै २०१८ मध्ये आपल्या शिफारशींवर ठाम असल्याचा निर्वाळा दिल्याने अतिशय नाइलाजाने आणि जड अंतःकरणाने केंद्र सरकारने न्यायमूर्ती के.एम. जोसेफ यांच्या नियुक्तीचीच मार्ग मोकळा केला. हे विस्ताराने सांगण्याचा उद्देश इतकाच आहे की, कुठल्याही प्रकारच्या राजकीय दबावाला बळी न पडता निःस्पृहपणे आणि निडरपणे काम करणारा उच्च न्यायालयाचा एक न्यायाधीश लोकशाहीचे रक्षण कसे करू शकतो, याचे मूर्तिमंत उदाहरण म्हणून याकडे पाहता येते. न्यायदानाचे काम कसल्याही दबावाशिवाय करणाऱ्या न्यायाधीशांच्या बढत्या, बदल्या यांमध्ये राजकीय व्यवस्थेच्या हातातील बाहुले न बनता सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायवृंदाने आपले नेमून दिलेले काम निष्ठेने केले, तर न्यायव्यवस्था खऱ्या अर्थाने स्वतंत्रपणे काम करू शकेल. संविधानाने नेमून दिलेले काम व्यवस्थेतील एक व्यक्ती वा कार्यालयाने पार पाडले, तर किती विस्मयकारक बदल होऊ शकतो, हे या निमित्ताने अधोरेखित झाले. खरे तर या साऱ्या प्रकरणात राज्यपालाने आपले सांविधानिक कर्तव्य पार पाडले असते, तर लोकशाहीची लक्तरे अशी वेशीवर टांगली जाण्याची वेळच आली नसती.

यानंतर तर राज्यपालांच्या एककल्ली, पक्षपाती, असांविधानिक कार्यप्रणालीचा कळसाध्याय पाहायला मिळाला. गोवा, मणिपूर आणि बिहार या राज्यांमध्ये एकापाठोपाठ एक अशा प्रकरणांमध्ये राज्यपाल या पदाची उंची आणि सन्मान त्या पदावरील व्यक्तींनीच पायदळी तुडविल्याचे २०१७ मध्ये पाहायला मिळाले. गोव्यामध्ये कुठल्याच पक्षाला स्पष्ट बहुमत मिळाले नव्हते. काँग्रेसला ४० जागांपैकी सर्वाधिक १७ जागा मिळाल्या होत्या. परंतु गोव्याच्या राज्यपाल मृदुला सिन्हा यांनी सर्वांत मोठा पक्ष असणाऱ्या पक्षाला सत्तास्थापनेसाठी बोलाविण्याची काहीच आवश्यकता नसते, असे अजब तर्कशास्त्र लावत भाजपला सत्तास्थापनेसाठी बोलावले. मणिपूरमध्ये विधानसभेच्या ६० जागांपैकी काँग्रेसला २८ जागा मिळून तो पक्ष सर्वांत मोठा ठरला होता. परंतु राज्यपाल नजमा हेपतुल्ला यांनी भाजपला सत्तास्थापनेसाठी बोलावले. भाजपने एनपीपीचे ४, नागा पीपल्स फ्रंटचे ४ आणि तृणमूल काँग्रेसचा १ अशी मोट बांधत सरकार स्थापन केले. बिहारमध्ये नितीशकुमार यांच्या नेतृत्वाखालील काँग्रेस आणि राजदने आपला पाठिंबा काढून घेत युती तोडली. राजदने सत्तास्थापनेचा दावा केला. तो सर्वांत मोठा पक्ष होता, परंतु राज्यपाल केशरीनाथ त्रिपाठी यांनी भाजपच्या पाठिंब्यावर नितीशकुमार यांना सत्तास्थापनेसाठी आमंत्रित केले. मेघालयात २०१८ मध्ये काँग्रेसने ५० पैकी २१

जागांवर विजय मिळविला होता. एनपीपी १९, भाजप २ आणि यूडीपी ६ जागांवर विजयी झाले होते. राज्यपाल गंगा प्रसाद यांनी एनपीपीचे कॉनरॅड संगमा यांना सत्तास्थानेसाठी आमंत्रित केले. त्यांना  यूडीपी, पीडीएफ, एचएसपीडीपी आणि  भाजपने पाठिंबा दिला. म्हणजे काँग्रेस वगळता जेवढे पक्ष होते, त्यांनी पाठिंबा दिला. परंतु काँग्रेस सर्वांत मोठं पक्ष असूनही त्याला सत्तास्थापनेची संधी दिली गेली नाही. सरकार कुठल्या पक्षाचे बनते, हा मुद्दा गौण आहे, परंतु राज्यपालांनी सांविधानिक जबाबदारीकडे पूर्णपणे दुर्लक्ष करून एखाद्या पक्षाच्या अतिउत्साही कार्यकर्त्याच्या भूमिकेत जाऊन आपला कार्यकाळ पूर्ण करावा, हा अतिशय धोकादायक पायंडा पडतो आहे.

सत्तानाट्यातील केंद्र सरकारचे संधिसाधू वागणे (कुठलाही राजकीय पक्ष याला अपवाद नाही) एक वेळ समजू शकते, कारण ते सक्रिय राजकारणात असलेल्या राजकीय पक्षाकडून चालविले जाते. त्यामुळे राजकीय डावपेच, कुरघोड्या, राजकीय लाभ, संधी यांचा विचार करून कृती करणे याचे सरसकट समर्थन नाही केले तरी तो राजकारणाचा आणि सत्ताकारणाचा व्यावहारिक भाग म्हणून समजून घेता येईल. पण या प्रकरणातील राष्ट्रपती आणि राज्यपाल या सर्वोच्च घटनात्मक पदांवरील व्यक्तींनी सत्ताकारणातील एक प्यादे म्हणून सहभागी व्हावे, हे कितपत समर्थनीय आहे? सांविधानिक नैतिकता व साधनशुचिता यांचा विचार सक्रिय राजकारणातून निवृत्त होऊन सर्वोच्च सांविधानिक पदावर गेलेल्या व्यक्तीने करू नये, हे दुर्दैवी आहे. आपल्याला नियुक्त करणाऱ्या पक्षाच्या हडेलहप्पी भूमिकेचे आपल्या पदाचा वापर करून समर्थन वा अंगीकार करताना हे पद राजकीय नाही तर सांविधानिक आहे, याचा मूलभूत विचार करणे गरजेचे आहे. राज्यपाल हा सत्तेच्या बुद्धिबळाच्या पटावरील प्यादे नसतो. बुद्धिबळाचा डाव पटावरील चौसष्ट घरांमध्ये चालतो. प्यादे, हत्ती, घोडे, वजीर, राणी, राजा आपापल्या चालीने आणि क्षमतेने खेळात असतात. लोकशाहीच्या बुद्धिबळाच्या पटावर राज्यपालाचे स्थान चौसष्ट घरांमध्ये नसते. राज्यपालाचे एक स्वतंत्र पासष्टावे घर असते आणि ते पटावर नाही, तर त्या पटापेक्षा उच्च स्थानावर असते. तो बुद्धिबळाचा डाव त्याच्या नियमांप्रमाणे खेळला जातोय ना, हे पाहणाऱ्या निष्पक्ष आणि निःस्पृह न्यायाधीशाचे ते स्थान असते. न्यायालयातील न्यायाधीशापेक्षा हा न्यायाधीश वेगळा असतो. न्यायालयातील न्यायाधीशाकडे आपण एखादे गैरकृत्य झाल्यानंतर जातो. इथे राज्यपाल असा न्यायाधीश असतो– जो लोकशाहीच्या पटावर गैरकृत्य होऊच नये, म्हणून अखंडपणे पहारा देत असतो. राज्यातला हा कारभार आपल्या नावाने चालविला जातो– म्हणजे आपण स्वामी आहोत, कुणी तरी नियुक्ती करून उपकृत केलेले कृपाभिलाषी नाही– हे या पदावरील व्यक्तींनी लक्षात घेणे गरजेचे आहे. राज्यघटनेचे कलम १५९ नुसार राज्यपाल जी शपथ घेतात, ती ‘संविधानाच्या रक्षणाची’ असते; नियुक्त करणाऱ्या राजकीय पक्षाच्या राजकीय भूमिकेच्या रक्षणाची नाही. याही पदावरील व्यक्तीने कायदा, संविधान, नैतिकता पाळायची नसेल तर त्या पदाचे प्रयोजन काय, याचा विचार करणे गरजेचे आहे. सत्तेच्या सारीपाटावर प्रत्येक जण सत्तेच्या साठमारीत गुंतलेला असताना कुणी तरी यापेक्षा वेगळ्या, निरपेक्ष आणि सर्वात महत्वाचे म्हणजे संविधानिक दृष्टीने याकडे पाहणारा असावा यासाठी त्या पदाची निर्मिती केली आहे. सत्तेच्या या खेळामध्ये जो राजकीय चष्म्यातून नाही तर संविधान, कायदा, नैतिकता, साधनशुचिता यांच्या दृष्टीने पाहील. आपण चौसष्ट घरांतील खेळात राजाला वाचविण्यासाठी बळी जाण्यासाठीच असणारे प्यादे नाही, तर या पटापेक्षा उच्च स्थानी असणाऱ्या पासष्टाव्या घरातील स्वामी आहोत– ही जाणीव राज्यपालांमध्ये निर्माण होणे गरजेचे आहे. ही जाणीव राज्यपालांमध्ये जेव्हा येईल तो काळ लोकशाहीसाठी सुवर्णकाळ असेल!

**प्रा. डॉ. प्रतापसिंह भीमसेन साळुंके**
1982prataps@gmail.com / Mob. 9960887411
मराठवाडा मित्र मंडळाचे शंकरराव चव्हाण विधी महाविद्यालय, पुणे

चिनी महासत्तेचा उदय : २३

सतीश बागल



# हु जिंताव आणि तियानमेन चौकातील कन्फ्युशिअस

२००२ च्या शेवटी १६ व्या काँग्रेसमध्ये जियांग झेमिन सत्तेतून पायउतार झाले आणि २००३ पासून हु जिंताव यांच्याकडे सत्ता आली. पक्षाचे प्रमुखपद व राष्ट्राध्यक्षपद हु जिंताव यांच्याकडे या काँग्रेसमध्ये हस्तांतरित झाले खरे; मात्र आणखी एक महत्त्वाचे पद- सेन्ट्रल मिलिटरी कमिशनचे अध्यक्षपद मात्र जियांग झेमिन यांनी सोडले नाही. ते या महत्त्वाच्या पदावर सप्टेंबर २००४ पर्यंत राहिले. हु जिंताव यांनी २००४ मध्ये सप्टेंबरअखेर अनेक अंतर्गत हालचाली करीत व अप्रत्यक्षपणे जियांग यांना शह देत सीएमसीचे अध्यक्षपद स्वतःकडे घेतले. पॉलिट ब्युरोच्या स्थायी समितीतही ९ पैकी ६ सदस्य जियांग झेमिन यांच्या खास वर्तुळातील होते. हे सारे मुळात शांघायमधील शक्तिशाली समजल्या जाणाऱ्या स्थानिक कम्युनिस्ट पक्षाचे सदस्य होते. त्याला 'शांघाय क्लिक' असेही म्हटले जात असे. अर्थातच पुढे-पुढे यातील काही सदस्य हे हु जिंताव यांचेही हितचिंतक बनले. त्यापैकी झेन शिंगहँग (Zhen Qinghang) हे मुळात जियांग यांचे शिष्य, पण ते पुढे हु जिंताव यांचे समर्थक झाले. कारण हु जिंताव यांच्यातर्फे ते जियांग यांच्याकडे अनेक महत्त्वाच्या मुद्यांवर राजकीय सहमती मिळविण्यासाठी प्रयत्नशील असत. तसे पाहिल्यास, हु जिंताव हे चीनचे खऱ्या अर्थाने २००४ मध्ये सर्वेसर्वा झाले.

हु जिंताव २००२ मध्ये सत्तेवर आले आणि २०१२ च्या डिसेंबरपर्यंत म्हणजे १० वर्षे सत्तेवर राहिले. डेंग व जियांग झेमिन या दोघांच्या राजवटीत आर्थिक विकासाला जोरदार सुरुवात झाली. मात्र, आंतरराष्ट्रीय मंचावर व परराष्ट्र धोरणात चीनची भूमिका अमेरिकेशी व इतरांशी जुळवून घेण्याची व थोडी बचावात्मक अशीच राहिली. जगभर कम्युनिझमची पीछेहाट होत असल्याने चीनलाही थोडे सबुरीने घ्यावे लागत होते. हु जिंताव हे मात्र खऱ्या अर्थाने चीनच्या आर्थिक व राजकीय सामर्थ्याबाबत आत्मविश्वास असलेले तडफदार नेतृत्व होते. भविष्यकाळात आपण सामर्थ्यवान होऊ, असा आत्मविश्वास डेंग व जियांग दोघांना होता. मात्र, आंतरराष्ट्रीय पटलावर जागतिक महत्त्वाची भूमिका बजावण्यासाठी आवश्यक असणारे सामर्थ्य व क्षमता

हु जिंताव यांनी सरकारी कामकाजात पारदर्शकता आणण्याचाही प्रयत्न केला. भ्रष्टाचारविरोधातही त्यांनी अनेक उपाययोजना करण्याचा प्रयत्न केला. मोठे चिनी नेते दर वर्षी बिडेह (Beidaihe) समुद्रकिनाऱ्यावर एकत्र जमत. दैनंदिन जीवनाच्या धबडग्यातून दोन दिवस मुक्त होऊन एकत्र येणे, हे उद्दिष्ट्य असले तरी पुढे-पुढे ही सहल म्हणजे अत्युच्च स्तरावरील शक्तिमान चिनी नेत्यांची दर वर्षी एकत्र येण्याची जागा झाली. पक्षनेत्यांना शिस्त लावण्यासाठी हु जिंताव यांनी हा प्रकार २००४ मध्ये पूर्णपणे बंद करून टाकला. मात्र हु जिंताव यांचे प्रशासन एक हाती एकवटलेले नव्हते, ते सल्लामसलत करून निर्णय घेत. हे चांगले असले तरीही बदल घडवून आणण्याच्या दृष्टीने त्याला मर्यादा होत्या. हु यांच्या प्रशासनाचे वर्णन काही चिनी लोक Nine dragons taming the water असे करीत असत. याचा अर्थ असा की, हु यांच्या पॉलिट ब्युरोच्या स्थायी समितीतील नऊ सदस्य आपापल्या परीने व पद्धतीने त्यांचे स्वतःचे हितसंबंध जपत होते.

चीनमध्ये आली आहे, हे भान हु जिंताव व त्यांचे सहकारी, पंतप्रधान वेन जिआबाओ यांना पूर्णपणे होते. जियांग यांच्या काळात उच्च आर्थिक दरवाढ राखणे आणि आंतरराष्ट्रीय व्यापारात झेप घेऊन जागतिक अर्थव्यवस्थेत महत्त्वाचे स्थान मिळविणे ही उद्दिष्टे होती. हु जिंताव यांच्या काळात मात्र चीन एक समर्थ जागतिक सत्ता झालेला होता. त्यामुळे आर्थिक सुधारणा, अंतर्गत सुरक्षा, अर्थव्यवस्थेचे आधुनिकीकरण, उच्च शिक्षण व संशोधन, प्रगत तंत्रज्ञान, पर्यावरण, शहरविकास आणि नागरिकरण या विषयांबरोबरच संतुलित विकास, सामाजिक स्थैर्य व पर्यावरणविषयक प्रश्न यांचाही विचार सुरू झाला. याशिवाय आंतरराष्ट्रीय राजकारणात चीनची भूमिका निश्चितपणे काय असावी, याचेही व्हिजन हु जिंताव यांच्या भूमिकेत होते. चीनमधील आधुनिकीकरणाला व समाज-स्वास्थ्याला पुष्टी देणाऱ्या चिनी संस्कृतीमधील पारंपरिक विचार व पद्धती अशा बाबींचा विचारही हु जिंताव यांच्या व्हिजनमध्ये होता. या अर्थाने पाहू गेल्यास, हु जिंताव यांच्या धोरणांमध्ये चिनी महासत्तेच्या उदयाबद्दलचे व भविष्याचे चिंतन दिसून येते. आंतरराष्ट्रीय प्रश्नांबाबत- विशेषतः अमेरिकेबाबत डेंग आणि जियांग हे अनेकदा सबुरीने घेत, थोडे नमतेही घेत. हु जिंताव यांच्या काळापासून चीनची भूमिका थोडी ताठर झाली, असे म्हणता येईल.

हु जिंताव हे अतिशय हुशार व कार्यक्षम असले, तरी एखाद्या करारी नोकरशहासारखे होते. त्यांची वागण्याची पद्धतही बरीच औपचारिक असे आणि एखाद्या मुद्यावर सहमती मिळविल्याशिवाय ते पुढे जात नसत. सामूहिक नेतृत्वासाठी ते आदर्श होते. हु जिंताव यांचा जन्म जिआंग्सू प्रांतातील जिआंग्यान येथे १९४२ मध्ये झाला. मुळात अनहुई प्रांतातील त्यांचे कुटुंब येथे येऊन स्थिरावले होते. वडील छोट्या प्रमाणावर चहाचा व्यवसाय करीत असत. परिस्थिती बेताचीच होती. आई शिक्षिका होती. मात्र, हु जिंताव सात वर्षांचे असतानाच तिचे निधन झाले. त्यामुळे त्याच्या मावशीने त्यांना वाढविले. हु जिंताव हे लहानपणापासूनच तरतरीत व अभ्यासात हुशार होते. चिंगहुआ (Tsinguha) विद्यापीठातून त्यांनी इंजिनिअरिंगची पदवी १९६४ मध्ये घेतली. याच काळात विद्यापीठात त्यांचा परिचय लिऊ यॉंगशिंगशी झाला. पुढे तिच्याशी त्यांनी लग्नही केले. हु जिंताव यांची १९६८ मध्ये गान्सू (Gansu) प्रांतात बदली झाली. तिथे त्यांनी एका मोठ्या जलविद्युत्‌ केंद्राच्या उभारणीच्या प्रकल्पावर काम केले. याच काळात ते स्थानिक कम्युनिस्ट पक्षाचे सक्रिय सदस्य झाले. इंजिनिअरिंग विषयापेक्षाही कम्युनिस्ट पक्षातील राजकारणात ते हळूहळू अधिक रमू लागले. गान्सू प्रांताच्या बांधकाम विभागाचे १९७३ मध्ये ते सचिवही झाले. डेंग झिओपेंग यांनी चार महत्त्वाच्या क्षेत्रांतील आधुनिकीकरणाचा कार्यक्रम १९८० मध्ये सुरू केला. या कार्यक्रमासाठी अधिक कार्यक्षम, निष्ठावंत आणि तांत्रिक व व्यावसायिक ज्ञान असलेले कम्युनिस्ट कार्यकर्ते व पदाधिकारी यांची गरज होती. गान्सू प्रांताचे पक्ष सचिव सॉंग पिंग (Song Ping) यांनी हु जिंताव यांची कर्तबगारी हेरून या कार्यक्रमांतर्गत मोठ्या पदासाठी त्यांची शिफारस केली. याच प्रांतातील दुसरे असेच कार्यक्षम पदाधिकारी वेन जियाबाओ यांनाही अशीच मोठी जबाबदारी दिली. योगायोग म्हणजे, पुढे २००३ मध्ये हु जिंताव हे चीनच्या कम्युनिस्ट पक्षाचे राष्ट्राध्यक्ष झाले, तेव्हा त्यांचे सहकारी व चीनचे पंतप्रधान म्हणून वेन जियाबाओंची नेमणूक झाली.

हु जिंताव हे १९८२ मध्ये गान्सू प्रांतातील कम्युनिस्ट युथ लीगचे सचिव, तसेच चीनच्या युथ फेडरेशनचे अध्यक्ष झाले. नंतर बीजिंगमधील सेन्ट्रल पार्टी स्कूलमध्ये काही काळ व्यतीत केल्यानंतर १९८५ मध्ये ४२ व्या वर्षी खऱ्या अर्थाने ते राजकारणात आले. पक्षाचे महासचिव हु याओबांग यांनी त्यांना गिझ्हौ (Guizhou) प्रांतात पक्षसचिव या अत्यंत महत्त्वाच्या पदावर नेमले. या मागास प्रांताची अर्थव्यवस्था गतिमान करण्याचा त्यांनी आटोकाट प्रयत्न केला. त्या निमित्ताने ते प्रांतातील ८६ जिल्ह्यांमध्ये प्रत्यक्ष फिरून निर्णयप्रक्रिया गतिमान करीत असत. १९८७ मध्ये चीनभर विद्यार्थ्यांची निदर्शने सुरू असताना हु जिंताव यांनी त्यांच्या प्रांतातील विद्यार्थांची निदर्शने फारसा गाजावाजा न करता बंद करण्याची करामत करून दाखवली. हाताबाहेर चाललेल्या निदर्शनांच्या संदर्भात डेंग झिओपेंग यांनी हु याओबांग यांना १९८७ मध्ये डच्चू दिला. त्यानंतर झालेल्या राजकीय बदलांमध्ये हु जिंताव यांची नेमणूक बीजिंगपासून दूरवर, स्वायत्त तिबेट प्रांतात पक्षसचिव म्हणून झाली. तिबेटमधील तिबेटी वंशाचे लोक आणि चीनमधील मूळचे हानवंशीय लोक यांच्यात नेहमी संघर्ष सुरू असे. तिबेटमध्ये सैन्यदल अनेकदा स्थानिक बंडखोरी व राजकीय उठाव मोडून टाकत असल्याने पक्षसचिवाच्या पदाबरोबरच हु जिंताव यांना पोलिटिकल कॉमिसारचे काम करावे लागे.

त्यामुळे तिबेटसारख्या मोठ्या, अशांत आणि भिन्न संस्कृती, भाषा व परंपरा असलेल्या प्रदेशाच्या प्रमुख नेतेपदाचा अनुभव त्यांना मिळाला. तियानमेन प्रकरणानंतर तिबेटमधील बंडाळी १९८९ मध्ये खूप वाढल्याने त्यांना ल्हासामध्ये २००० हून अधिक सशस्त्र पोलिसांच्या मदतीने शांतता प्रस्थापित करावी लागली.

तिबेटचे चीनमध्ये १९५९ मध्ये सामिलीकरण होण्याच्या वेळी तिबेटी लोकांचा मोठा उठाव झाला होता. त्याला तीस वर्षे होऊन गेली. या उठावाच्या तिसाव्या वर्षाच्या आठवणी जागविताना तिबेटी लोकांनी मार्च १९८९ मध्ये तीव्र निदर्शने केली. परिस्थिती अतिशय स्फोटक झाली होती. सशस्त्र पोलिसांनी केलेल्या गोळीबारात अनेक लोक मारले गेले आणि दुसऱ्याच दिवशी हु जिंताव यांनी केंद्र सरकारला मार्शल लॉ लागू करण्याबाबत प्रस्ताव दिला. हु जिंताव यांनी प्रत्यक्ष गोळीबार करण्याबाबत आदेश दिले किंवा नाही, हे जरी स्पष्ट नसले तरी या मुद्यावर हु जिंताव यांनी आवश्यकतेपेक्षा जास्त कठोरपणे पावले उचलली असे म्हटले जाते. किंबहुना, त्यानंतर तीन महिन्यांनी तियानमेन चौकात विद्यार्थ्यांची निदर्शने लष्कराच्या बळावर मोडून काढण्यात आली, तीही हु जिंताव यांच्या तिबेटमधील कठोर कारवाईमधून प्रेरणा घेऊनच, असेही काही म्हणतात. जून १९८९ मध्ये लष्कराचे रणगाडे आणि चिलखती गाड्या बीजिंगमधील रस्त्यातून तियानमेन चौकात विद्यार्थी निदर्शकांवर जेव्हा चालून गेल्या, तेव्हा त्या कारवाईचे समर्थन करणारे पहिले प्रादेशिक प्रमुख म्हणजे हु जिंताव!

विरोधकांना कसे नमवयाचे आणि त्यांचा कसा बंदोबस्त थंडपणे करायचा, या कलेत हु जिंताव वाकबगार होते. फारसे भावनिक न होता, कारवाई करण्याची हु जिंताव यांची हातोटी पाहून डेंग यांचे हु जिंताव यांच्याबद्दलचे मत खूपच अनुकूल झाले. पुढे फार उंचीवरील प्रदेशात त्रास होतो, या कारणास्तव हु जिंताव बीजिंगला आले आणि बीजिंगच्या राजकारणाचा एक भाग बनले. राष्ट्रीय स्तरावर असेच नेतृत्व चीनला भविष्यात हवे, हे डेंग यांच्या मनाने घेतले. त्यामुळे वयाची पन्नाशी गाठण्याआधीच हु जिंताव हे अतिशय महत्त्वाच्या व संवेदनशील राजकीय पदावर येऊन पोहोचले. १९९२ मध्ये, म्हणजे तीन वर्षांतच जियांग झेमिन यांच्या पॉलिट ब्युरोच्या स्थायी समितीत सर्वांत तरुण सदस्य म्हणून हु जिंताव यांचा समावेश झाला. त्यामुळे पक्षातील वरिष्ठ नेते त्यांच्याकडे जियांग झेमिन यांच्या नंतरचे भावी नेतृत्व म्हणून पाहू लागले. त्यांनी कम्युनिस्ट पक्षाच्या सचिवालयाचा ताबा १९९२ मध्ये घेतला आणि केंद्रीय समितीचे (सेन्ट्रल कमिटीचे) दैनंदिन कामकाज ते पाहू लागले. त्यानंतर त्यांनी सेन्ट्रल पार्टी स्कूल स्वतःच्या प्रभावाखाली आणले. पक्षाच्या या दोन्ही महत्त्वाच्या

चीनचे अध्यक्ष हु जिंताव आणि पंतप्रधान वेन जियाबाव



संस्थांशी दैनंदिन निकटचा संबंध आल्याने त्यांना पुढील ७-८ वर्षांत पक्षात व सरकारात चांगला जम बसविता आला. हु जिंताव हे शिस्तीचे व योग्य पद्धतींचे पालन करणारे असल्याने त्यांनी नेहमीच काटेकोरपणे स्वतःला थोडे बाजूला ठेवीत जियांग झेमिन यांनाच प्रकाशात ठेवले. त्यामुळे जियांग झेमिन व हु जिंताव यांच्यात फारसा तणाव निर्माण झाला नाही. उलट, हु जिंताव यांनी जियांग झेमिन यांच्या प्रेरणेने सुरू झालेल्या थ्री स्ट्रेसेस कॅंपेन किंवा सैद्धांतिक शुद्धीकरणाच्या त्रिसूत्री मोहिमेचे नेतृत्व करून जियांग झेमिन यांचे स्थान बळकट करण्याचा प्रयत्न केला.

आर्थिक समृद्धीमुळे कम्युनिस्ट पक्षातील सदस्य वैयक्तिक स्वातंत्र्याच्या संकल्पनेकडे आकर्षित तर होणार नाहीत आणि त्यामुळे भविष्यात पक्षाच्या बांधिलकीवर विपरीत परिणाम तर होणार नाही ना, ही भीती कम्युनिस्ट पक्षाच्या नेतृत्वाला नेहमीच सतावत असते. म्हणूनच सर्वच सदस्यांचे, पदाधिकाऱ्यांचे व नेत्यांचे सैद्धांतिक शुद्धीकरण होणे वरिष्ठ नेत्यांना आवश्यक भासत असे. माओंनी तर याचा अतिरेक केला होता. वरिष्ठ नेते अनेकदा अशा मोहिमांचा उपयोग इतरांना व प्रतिस्पर्ध्यांना जरब बसविण्यासाठी करीत. या मोहिमेअंतर्गत सर्व स्तरांतील, संस्थांतील व संघटनांतील कर्मचाऱ्यांना, सदस्यांना कम्युनिस्ट पक्षाची मूळ उद्दिष्टे व तत्त्वे यांचा अभ्यास करून आपल्या वैयक्तिक आयुष्यात आणि व्यावसायिक, सामाजिक, राजकीय व दैनंदिन जीवनात कम्युनिस्ट पक्षाची उद्दिष्टे व तत्त्वे पाळतो का, याबद्दल विचार करणे अभिप्रेत असे. आपल्या वर्तनात-विचारात त्रुटी असतील तर त्या मोकळेपणे मान्य करून स्वतःची निर्भर्त्सना करणे अपेक्षित असे. इतरांनाही मोकळेपणाने आपल्या वर्तनावर, कृतीवर व विचारांवर टीका करू द्यावी, असाही विचार या मोहिमेत होता. या मोहिमेत संस्था व संघटनांमध्ये विशेष सत्रे आयोजित करून, सर्वांच्या वर्तनाचे पृथःकरण करून, दोष दाखवून सुधारणा करण्याबाबत कार्यवाही होत असे. यातून संस्थेचे, संघटनांचे वरिष्ठ पदाधिकारीही सुटत नसत.

जियांग झेमिन यांनी या मोहिमेचा उपयोग करून स्वतःचे स्थान पक्के केले व विरोधकांना चाप लावणेही सुरू केले. हु जिंताव हे जियांग झेमिन यांचे राजकीय वारसदार असल्याने त्यांनी जियांग यांचे स्थान पक्के करण्यात मदत केली. हु जिंताव १९९८ मध्ये चीनचे उपाध्यक्ष झाल्यानंतर हे जियांग यांना परराष्ट्र धोरण आखण्यात व त्याबाबत सल्ला देण्यातही मदत करीत. बेलग्रेडमधील चिनी वकिलातीवर NATO च्या विमानांकडून १९९८ मध्ये बॉम्बहल्ला करण्यात आल्यानंतर उपाध्यक्ष म्हणून हु जिंताव यांनीच प्रकरण धसास लावले. हु जिंताव आणि त्यांचे सहकारी-पंतप्रधान वेन जियाबाओ यांनी वाढती आर्थिक सुबत्ता व राष्ट्रीय उत्पन्न यांच्याबरोबरच लोककल्याणाचा आणि सामाजिक स्थैर्याचाही विचार केला व त्यास महत्त्व दिले. दोन दशकांत केवळ उच्च आर्थिक विकासाला महत्त्व दिल्याने पक्षात व सरकारमध्ये भ्रष्टाचार माजून सामाजिक अस्वस्थता निर्माण झाली होती. कम्युनिस्ट पक्षाचे लोकांच्या मनात असलेले नैतिक स्थान डळमळीत होऊ लागले होते. लोक सरकारलाच प्रश्न विचारू लागले होते. यातूनच पुढे राजकीय लोकशाही व वैयक्तिक स्वातंत्र्य यांची मागणी पुढे येऊ शकते, हे त्यांना चांगले ठाऊक होते. म्हणूनच एक सामाजिक उद्दिष्ट म्हणून चीनमध्ये आर्थिक विषमता दूर करणारे, सामंजस्य वाढविणारे आणि संवादी समाज (Harmonious Socialist Society) निर्माण करण्याचे धोरण त्यांनी अंगीकारले. या धोरणात गरीब व मागासलेल्या लोकांसाठी, मागासलेल्या भागांसाठी विशेष कार्यक्रम आखण्यावर भर होता; तसेच भ्रष्टाचाराला पायबंद घालणाऱ्या, पर्यावरणाचा ऱ्हास थांबविणाऱ्या, ग्रामीण व शहरी भागातील लोकांचे जीवन अधिक सुसह्य करणाऱ्या आणि समतोल विकासावर भर देणाऱ्या उपाययोजनांचा समावेश होता. ग्रीन जीडीपी (ग्रीन ग्रॉस डोमेस्टिक प्रॉडक्ट) ही संकल्पनाही या काळात चीनमध्ये मूळ धरू लागली होती. त्यामुळे परंपरागत आर्थिक सकल राष्ट्रीय उत्पन्न (जीडीपी) मोजताना पर्यावरणाचा जो ऱ्हास होतो, त्यामुळे होत असणारे नुकसानही त्या उत्पन्नातून वजा करावे, हा विचार रूढ होत चालला. यासाठी हु जिंताव यांनी शास्त्रीय विकासाची संकल्पना (Scientific Development Concept) विकसित करण्यावर भर दिला. त्यात समग्र विकास आणि आर्थिक, सामाजिक व पर्यावरणीय प्रश्न सोडविण्यासाठी धीम्या पद्धतीने करावयाची कार्यवाही अपेक्षित होती. शिवाय या कार्यक्रमांतर्गत राजकीय सुधारणांचा उल्लेख नसला तरी पक्षाच्या अंतर्गत व उच्चस्तरीय नेतृत्वामध्ये, आवश्यकता भासेल तेव्हा, राजकीय सुधारणांची गरजही स्वीकारली होती. मात्र या राजकीय सुधारणांबाबत उघडपणे कोणीही बोलत नसे. शास्त्रीय विकासाची संकल्पना (Scientific Development

Concept) म्हणजे सर्वांगीण, संतुलित, सर्वांना बरोबर घेऊन जाणारी विकासाची संकल्पना. या संकल्पनेचा चीनच्या राज्यघटनेत २००७-२००८ मध्ये अंतर्भाव केलेला होता.

हु जिंताव यांचा दहा वर्षांचा काळ चीनमध्ये मोठ्या घडामोडींचा होता. उच्च आर्थिक विकास, मोठ्या प्रमाणावर पायाभूत सुविधांमध्ये गुंतवणूक, प्रचंड वाढता व्यापार व औद्योगिकीकरण, अवकाश संशोधन, वाढते नागरीकरण, सैन्यदलाचे आधुनिकीकरण व शहरांची वाढ यामधून अर्थव्यवस्था वाढली. शिवाय २००८ चे बीजिंग ऑलिंपिक आणि २०१० चे शांघाय एक्स्पो हे दोन फार मोठे आंतरराष्ट्रीय उपक्रम हाती घेतले गेले. २००८ मध्ये जागतिक मंदीच्या काळातही चीनची आर्थिक कामगिरी उत्तम होती. इतकेच नव्हे, तर चीनमधील आर्थिक वाढीमुळे जगभरची अर्थव्यवस्था सावरली गेली. तैवानबरोबरचे संबंध सुधारले. शेतीवरील अनेक कर रद्द करण्यात आले, ग्रामीण भागातून शहरांमध्ये कामासाठी येणाऱ्या कामगारांवरील जाचक नियंत्रणे कमी करण्यात आली. संतुलित विकास करून किनारपट्टीचा प्रगत भाग आणि पश्चिमेकडील व पूर्वेकडील कमी विकास झालेल्या भागातील तफावत दूर करण्याचे प्रयत्न झाले. घरबांधणी कार्यक्रम विस्तारला. चीनमधील गरीब व मध्यम-वर्गीयांसाठी मोठ्या प्रमाणावर आरोग्यसेवा उपलब्ध करून दिली. कम्युनिस्ट राजवटी जगभर कोसळल्या असल्याने, हु जिंताव यांना चिनी पारंपरिक संस्कृती व विचार यांच्यातून येणारा राजकीय व सामाजिक विचार महत्त्वाचा वाटत होता. त्या आधारे त्यांनी प्रशासन व आर्थिक विकास यांचे मॉडेल बांधले. माओंच्या काळात सामाजिक सुसंवादाचे तत्त्वज्ञान सांगणारा कन्फ्युशिअस हा प्रतिगामी, क्रांतीचा शत्रू व जैसे थे तत्त्वज्ञानाच्या समर्थनाचे प्रतीक मानला जाई. हु जिंताव यांनी मात्र कन्फ्युशिअस व त्याच्या सामाजिक तत्त्वज्ञानाचे नुसतेच पुनरुज्जीवन केले नाही, तर त्याच्या तत्त्वज्ञानाच्या आधारे चिनी समाजाची बांधणी करण्याचे ठरविले. चीनचा २००० पासून पुढे जसा सर्व जगाशी आर्थिक महासत्ता म्हणून निकटचा संबंध येऊ लागला, तसतसे कन्फ्युशियसचे सोशल हार्मनी व शांततापूर्ण सहअस्तित्वाचे तत्त्वज्ञान हे चीनने स्वतःचे, समाजाचे व आंतरराष्ट्रीय समूहात टिकून राहण्याचे तत्त्वज्ञान म्हणून स्वीकारले. कन्फ़्युशियसच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास करण्यासाठी अनेक संस्था निर्माण झाल्या. या संस्था आणि त्यांचा कारभार आता जगभर पसरला असून, या संस्थांमार्फत चिनी संस्कृती, भाषा व परंपरा यांचा जगभर प्रसार होतो. ऑलिंपिक सामने बीजिंगमध्ये २००८ मध्ये भरले तेव्हा एक खास चिनी वैशिष्ट्य म्हणजे उद्‌घाटनाच्या शानदार संचलनात कन्फ़्युशियस स्कॉलर्सच्या चमूने भाग घेतला होता. पुढे २०११ मध्ये चीन सरकारने चक्क तियानमेन चौकात मध्यभागी कन्फ़्युशियसचा एक पुतळा उभारला. तियानमेन चौकात माओच्या स्मृती स्मारकाच्या चौकातच हा पुतळा उभारून हु जिंताव यांच्या सरकारने आपण कन्फ़्युशियसच्या तत्त्वज्ञानाला किती महत्त्व देतो, हेही स्पष्ट केले. (सध्या हा पुतळा तिथून जवळ असलेल्या म्युझियममध्ये हलविला आहे).

हु जिंताव यांनी सरकारी कामकाजात पारदर्शकता आणण्याचाही प्रयत्न केला. भ्रष्टाचाराविरोधातही त्यांनी अनेक उपाययोजना करण्याचा प्रयत्न केला. मोठे चिनी नेते दर वर्षी बिडेह (Beidaihe) समुद्रकिनाऱ्यावर एकत्र जमत. दैनंदिन जीवनाच्या धबडग्यातून दोन दिवस मुक्त होऊन एकत्र येणे, हे उद्दिष्ट्य असले तरी पुढे-पुढे ही सहल म्हणजे अत्युच्च स्तरावरील शक्तिमान चिनी नेत्यांची दर वर्षी एकत्र येण्याची जागा झाली. पक्षनेत्यांना शिस्त लावण्यासाठी हु जिंताव यांनी हा प्रकार २००४ मध्ये पूर्णपणे बंद करून टाकला. मात्र हु जिंताव यांचे प्रशासन एक हाती एकवटलेले नव्हते, ते सल्लामसलत करून निर्णय घेत. हे चांगले असले तरीही बदल घडवून आणण्याच्या दृष्टीने त्याला मर्यादा होत्या. हु यांच्या प्रशासनाचे वर्णन काही चिनी लोक Nine dragons taming the water असे करीत असत. याचा अर्थ असा की, हु यांच्या पॉलिट ब्युरोच्या स्थायी समितीतील ९ सदस्य आपापल्या परीने व पद्धतीने त्यांचे स्वतःचे हितसंबंध जपत होते. म्हणजेच हु यांचा अजेंडा व कार्यक्रम चीनसाठी कितीही चांगला असला तरी खोलवर रुजलेले हितसंबंध, भ्रष्टाचार व अनिष्ट प्रथा यांना ते पायबंद घालू शकले नाहीत.

हु जिंताव यांच्या काळात अधिकाऱ्यांची दंडेली, सत्तेचा गैरवापर, बेकायदारीत्या केलेली कृत्ये याबाबत लोकांकडून जाब विचारणे सुरू झाले होते. इंटरनेटच्या प्रसारामुळे एखाद्या विषयाचा वा प्रकरणाचा तत्काळ बोलबाला होत असे. चीनमध्ये घटना व कायदे असूनही न्यायालये स्वतंत्र नव्हती. ती आजही नाहीत. त्यामुळे निदर्शक व ॲक्टिव्हिस्ट यांना कोणतेही संरक्षण नव्हते. चीनमध्ये

२०१३ पर्यंत सर्वोच्च न्यायालयाचे मुख्य न्यायाधीश कायदाक्षेत्रातील नसत, तर वरिष्ठ पोलीस अधिकारी वा कायदा व सुरक्षाविषयक अनुभव असलेले अधिकारी असत. हु जिंताव यांच्या काळातील मुख्य न्यायाधीश वँग शेंगजून हे अनहुई प्रांतातील पोलीस सेवेतील वरिष्ठ अधिकारी होते. त्यानंतर त्यांनी बीजिंग येथे अंतर्गत सुरक्षा विभागात उच्च पदावर काम केले होते. हु जिंताव यांच्या काळात कायदे एकतर्फी होते आणि मुख्य म्हणजे, न्यायालये स्वतंत्र नव्हती. ती पक्षाच्या विरोधात कधीही जाऊ शकत नसत. हु जिंताव यांच्या नेतृत्वाच्या दुसऱ्या सत्रात २००७ नंतर चीनभर अनेक प्रश्न निर्माण झाले. इंटरनेटच्या प्रसारामुळे चीनमध्ये लोकशाही व स्वातंत्र्याची मागणी मूळ धरू लागली. सिव्हिल सोसायटी व बुद्धिमंत हळूहळू सक्रिय होऊ लागले. इंटरनेटच्या जमान्यात सरकारला प्रत्येक गोष्ट व माहिती दडपणे अशक्य झाले. अर्थव्यवस्था खूप मोठी झाली व प्रबळ झाली हे खरे; परंतु त्याचबरोबर जगभरातील लोक चीनकडून राजकीय लोकशाहीची व नागरिकांच्या स्वातंत्र्याची अपेक्षा करू लागले, मानवी हक्कांची अपेक्षा करू लागले. सरकार व पक्ष यांच्या विरोधात चिनी लोक जाऊ लागले. यावरील उपाययोजना म्हणजे लोकांचे थोडे तरी ऐकून घेणे! त्यासाठी त्यांना काही तरी स्वातंत्र्य देणे आवश्यक होते. मात्र हे पक्षाच्या व सरकारच्या धोरणात बसणारे नव्हते. त्यामुळे २००८ पासून पुढे हु जिंताव आणि वेन जियाबाओ यांच्या सरकारचे अंतर्गत धोरण अधिक दडपशाहीचे झाले.

हु जिंताव यांच्याकडे सत्ता येत असतानाच दक्षिण चीनमध्ये SARS (सिव्हिअर ॲक्युट रेस्पिरेटरी सिंड्रोम) या श्वसनाच्या साथीच्या रोगाची लागण झाली. लागण झालेल्या SARS च्या ८००० हून अधिक रुग्णांपैकी ७७४ मृत्यू पावले. हे प्रकरण वरवर साथीच्या रोगाबद्दलचे व केवळ आरोग्यविषयक वाटले, तरी प्रत्यक्षात त्याचे राजकीय पडसाद फारच खोल व गंभीर होते. ही साथ तत्काळ नियंत्रणात आणली गेली नाही याचे अपयश सरकारचे होतेच; परंतु ज्या पद्धतीने त्यातील माहिती दडपण्याचा प्रयत्न झाला, ज्या पद्धतीने हे सारे प्रकरण उजेडात आले, त्यावरून चीनच्या राजकीय व व्यवस्थापकीय क्षमतांवर प्रश्न निर्माण झाले. एखाद्या बंदिस्त राजकीय व्यवस्थेमध्ये हे खपून गेले असते. परंतु २००१ मध्ये चीन WTO चा सदस्य झाल्यानंतर चीनचा वाढता आंतरराष्ट्रीय व्यापार व इतर देशांशी होत असलेले व्यवहार पाहता, या प्रकरणाला वाईट प्रसिद्धी मिळाली. नोव्हेंबर–डिसेंबर २००२ मध्ये या साथीची माहिती मिळाली, तरीही एप्रिल–मे २००३ पर्यंत कार्यवाहीबाबत गोंधळ सुरू होता. सरकारी विभागात तीन दिवस या अहवालाचा लिफाफाही उघडला गेला नव्हता. दक्षिणेकडील ज्या भागात ही साथ पसरली, तो भाग उद्योगधंद्याच्या दृष्टीने महत्त्वाचा असल्याने त्याबद्दलची माहिती सुरुवातीला दडपून टाकण्यात आली. लोकांना सावध न केल्याने व योग्य ती काळजी न घेतल्याने उपचार करणाऱ्या आरोग्यसेवेतील कर्मचाऱ्यांनाच प्रथम लागण झाली. मार्चमध्ये पीपल्स काँग्रेसचे अधिवेशन असल्याने त्याच्यापुढे हे प्रकरण जाऊ नये, म्हणून दडपण्यात आले. WHO चे (वर्ल्ड हेल्थ ऑर्गनायझेशन) तज्ज्ञ जेव्हा चीनमध्ये पाहणीसाठी आले, तेव्हा याच भीतीपोटी तज्ज्ञांच्या ग्रुपला आठ दिवस संबंधित इस्पितळात जाऊ दिले नाही. जेव्हा आरोग्यमंत्री व बीजिंगचे मेयरच या प्रकरणी चुकीची आकडेवारी व माहिती देऊ लागले, तेव्हा एका वरिष्ठ डॉक्टरने याला वाचा फोडली आणि परदेशी टीव्हीला याबाबतची माहिती दिली. या प्रकरणाने चीनची नुसती पंचाईतच झाली नाही; तर त्यांच्या प्रशासनाच्या क्षमतेवर प्रश्नचिन्ह उभे राहिले.

सार्वजनिक महत्त्वाच्या माहितीबाबत अनावश्यक गोपनीयता, स्वातंत्र्याचा अभाव, अपारदर्शी व्यवहार, माहितीचे चुकीचे व्यवस्थापन या साऱ्या बाबी या प्रकरणात दिसून आल्या. कठीण व गुंतागुंतीच्या प्रकरणात विश्वासार्हता व पारदर्शीपणा महत्त्वाचा असतो, हे तत्त्व पक्षाच्या हुकूमशाहीची सवय झालेल्या राज्यकर्त्यांना चटकन लक्षात आले नाही. इंटरनेटच्या प्रसारामुळे असे प्रकार लपविता येत नाहीत आणि त्यासाठी वस्तुस्थितीला सामोरे जाण्यासाठी सरकारला काही बाबतींत तरी लोकांना विश्वासात घ्यावे लागते, हेही सरकारला कळले. हु जिंताव यांनी अखेर आरोग्यमंत्री व मेयर यांना बडतर्फ केले. चीनमध्ये प्रथमच वर्तमानपत्रे व परदेशी टीव्हीवरील बातम्यांमुळे अशा रीतीने माहिती दडवून ठेवल्याच्या आरोपावरून पक्षातील वरिष्ठ नेत्यांवर कारवाई झाली.

(क्रमशः)

**डॉ. सतीश बागल**, नाशिक
bagals89@gmail.com
Mob. 9820864755

अभिवादन

मनोज बोरगावकर

# जिम कॉर्बेट : वाचकांचे आसमान उंचावणारा लेखक

दि.२५ जून १८७५ ला जन्मलेला जिम कार्बेट १९ एप्रिल १९५५ रोजी काळाच्या पडद्याआड गेला. कोणताही अभिनिवेश न दाखविता त्याने लिहून ठेवलेल्या नोंदी पुढील कित्येक पिढ्यांना समृद्ध करीत राहतील. त्याची पुस्तके म्हणजे जंगल कसे वाचावे याची बाराखडीच वाटत राहतात. जंगलातील दृश्य, आवाज व हालचाली जित्या-जागत्या करून वाचकासमोर मांडण्याची त्याची हातोटी विलक्षण अशीच आहे. जिम कॉर्बेटसारखी निसर्ग वाचण्याची करामत आपल्याला कधीही साधणार नाही; पण किमान जिम कॉर्बेट जरी आपल्याला वाचता आला, तरी आपल्या निसर्गविषयक आकलनात फार मोलाची भर पडलेली असेल- निसर्गासाठी नाही तर बरीचशी आपल्या अस्तित्वासाठीच... वाचकांच्या कक्षा रुंदावणारे लेखक बरेच असतात, पण जिम कार्बेट मात्र वाचकांचे आसमान उंचावणारा लेखक म्हणून पिढ्यान्‌पिढ्या हस्तांतरित होत राहील...

जिम कॉर्बेटने वयाच्या दहाव्या वर्षी पहिली शिकार केली, तीही नेमबाजीच्या स्पर्धेत बक्षीस मिळालेल्या रायफलने. मग हा सिलसिला किती तरी वर्षे चालू राहिला- अगदी सराईत शिताफीने आणि नरभक्षकाच्या भीतीच्या छायेत जीव मुठीत धरून जगणाऱ्यांना मोकळा श्वास द्यायचा, या नेकदिल ध्यासाने. गढवाली लोकांसाठी तो वाघाचे धारिष्ट्य अन् साधूचे कनवाळूपण असलेला गोरा साधूच होता. लग्न न करता तो वाघासारखा एकटाच जगला. म्हणूनच की काय, तो वाघाच्या नसनसेशी वाकिफ असावा. जिम कॉर्बेट हा रूढ अर्थाने गोरा साहेब तर नक्कीच नव्हता... अनवाणी पायांनी जंगलात वीस-वीस किलोमीटर न थकता-भागता पायपीट करणारा खेडूत तर होता. त्याही पलीकडे जनावरांचे-पाखरांचे आवाज हुबेहूब काढणारा आणि जंगलाचा रुतबा, रिवाज, ऐपत ओळखून त्यात सहज मिसळून जाणारा आदिवासी होता- असे म्हणणेच अधिक सयुक्तिक ठरेल.

नरभक्षक वाघांना मारण्याच्या या जीवघेण्या खेळात कधी कॉर्बेटला आडवी आली दबकत-दबकत पाठलाग करणारी चौगडची नरभक्षक वाघीण, तर कधी तालादेवीचा नरभक्षक. कधी भाग्यवान वाघ म्हणून पंचक्रोशीत नाव कमावलेला दबीधुऱ्याचा वाघ आणि त्या वाघाचे अनेक वेळा अविश्वसनीय तरीक्याने वाचणं. एक प्रसंग आवर्जून उल्लेख करावासा वाटतो- वाघ जिमच्या अगदी बंदुकीच्या टप्प्यात असतो. चार-दोन दिवसांत पाऊस पडून जमीन पोखर झालेली नसताना किंवा कोणतेही वारे-वादळ सुटलेलं नसतानाही भले मोठे झाड अचानक खचून काड्‌कन् कोसळते. आवाजासरशी तथाकथित भाग्यवान वाघ पुन्हा एकदा जिमला गुंगारा देतो. जिम या ठिकाणी आवर्जून नमूद करून ठेवतो की, तो खरोखरच भाग्यवान आहे याची खातरजमाच वाघ आपल्या परीने करून देत होता. आमच्यापैकी कोणालाही इजा झाली नाही, असा रोमहर्षक डाव आम्ही खेळलो. त्यानंतर मी दबीधुऱ्याला अनेक वेळा गेलो, पण त्या वाघाला कोणी मारल्याचे ऐकिवात नाही. म्हणजे तो वाघ वृद्ध सैनिकाप्रमाणे काळाच्या उदरात गडप झाला असेल. अशा अनेक

अद्‌भुतरम्य साहसी कथांचा ऐवज जिम जेव्हा वाचकांपुढे साक्षात करतो, तेव्हा वाचकांसाठी त्या केवळ शिकारकथा नसतात; तर जंगल, निसर्ग, प्राणी, माणूस यांच्यासंबंधांची ती सुबक अशी एक आकलनगाथाच असते. जिम कार्बेटची सांगण्याची हातोटी आणि शैली इतकी सच्ची आहे की, त्या शैलीसमोर आजचे वेल इक्विप्ड डिस्कव्हरी चॅनेलसुद्धा फिके वाटत राहतात.

निसर्ग आणि साहस यांच्या बेमालूम अदाकारीतून जिम कार्बेटने 'मॅन ईटर्स ऑफ कुमाऊँ' (१९४४), 'दि मॅन इटिंग लेपर्ड ऑफ रुद्रप्रयाग' (१९४७), 'जंगल लोअर' (१९५३) आणि 'टेंपल टायगर अँड मोर मॅन ईटर्स ऑफ कुमाऊँ' (१९५४) यांसारखी अफलातून पुस्तके लिहून निसर्गाकडे पाहण्याची एक जाणती नजर वाचकांना उपलब्ध करून दिली आहे. बंदूक ही कॉर्बेटची गरज होती, जंगल हे त्याचे पॅशन, तर कॅमेरा हा त्याचा जीव की प्राण...! म्हणूनच त्याने लिहिलेल्या जंगलकथा व चलच्चित्रपटागत आपल्या डोळ्यांसमोरून सरकत जातात.

प्राण्यांच्या क्रौर्याविषयीचे तोकडे असलेले आपले आकलन जिम कार्बेट वाचल्यानंतर वेगळ्या अर्थाने समृद्ध होत जाते. प्राण्यांच्या या क्रौर्यामागे सहेतुक अणुकुचीदार मानवी भावना नसून, जगण्याच्या लढाईत त्यांच्यासमोर शिल्लक असलेला तो एकमेव असा पर्याय असतो. त्यामुळे त्यांच्या हिंसेमागे केवळ हिंसेचे टोकदार पाठबळ नसते, तर त्यापुढे जाणारे सशक्त असे कारण असते... चच्चा-बच्चा सुरक्षित राहावा म्हणून कराव्या लागणाऱ्या सिझेरिनच्या कापाकापीगत. निसर्गाचे असे असण्यापलीकडचे दिसणे जिम कॉर्बेट मोठ्या देखण्या पद्धतीने उजागर करीत राहतो.

जंगलातल्या प्राण्यांच्या हिंसेकडे पाहण्याचा एक अधिक साफ सुथरा अशा मनाला भिडणाऱ्या दृष्टिकोनाची ऊरभेट जिम वाचकाला पदोपदी करून देऊन कळत-नकळत आपल्या निसर्गविषयक जाणिवा अधिकाधिक प्रगल्भ करीत जातो, मोठ्या नजाकतीने.

कॉर्बेट जेव्हा म्हणतो- जंगलातला कोणताही जीव स्वतःहून आक्रमक वा हल्लेखोर नसतो, परिस्थिती त्याला तसे करण्यास बाध्य करते... किंवा जगण्यातल्या लढाईत ही एकमेव बाराखडी त्यांच्याकडून घोटून घेतलेली असते; ऑदरवाईज वाघ अगदी भुकेला असला, तरी शेजारून जाणाऱ्या मनुष्य-प्राण्याकडे ढुंकूनही पाहत नाही किंबहुना, मानवी स्मेलच त्याला आवडत नाही. माणूस हा तसा कोणत्याही अर्थाने त्याच्यासाठी दखलपात्र ऐवजही नसतो. ना भीती म्हणून, ना भूक म्हणूनही. वाघाकडे असलेल्या अमाप ताकदीचा रुबाब त्याने कधी केल्याचे ऐकिवात नाही. वेळप्रसंगी केवळ अनिवार्य म्हणून ती वापरायची असते, अन्यथा ती म्यान करून ठेवल्यानेच ती अधिक रुबाबदार दिसत राहते. निसर्गाने कोणतीही ट्युशन फी न आकारता वाघाला दिलेले हे शहाणपण असते. वाघांचे उपजत असलेले हे शहाणपण 'पॉवर माँगर' असलेल्या माणसाला कधीही उमजणार नाही. म्हणूनच त्याच्या सत्तेचा रुबाब देखणा वाटण्याऐवजी ओंगळवाणाच वाटत राहतो. हे उमजण्यासाठी जिम कॉर्बेटसारखे जंगल नाही वाचले, तरी किमान कार्बेट तरी वाचलाच पाहिजे. साध्या-साध्या छोट्या-छोट्या प्रसंगांतून जगण्यातली सोपी-सोपी रहस्ये मोठ्या नफिस पद्धतीने जिम उलगडत जातो. मासल्यादाखल- जंगलातले सर्व जीव त्यांच्या नैसर्गिक परिस्थितीत अगदी आनंदाने जगत असतात. निसर्गात दुःख नाही, कशाची टोचणीही नाही. तळ्यातला एखादा पक्षी किंवा कळपातला प्राणी ससाण्याने किंवा एखाद्या मांसभक्षी जनावराने उचलला, तर कळपातले इतर जण आपली वेळ आली नव्हती, यातच मश्गूल राहणे पसंत करतात. किती ग्रेट आहे नाही, हे दुःखाच्या आसपासही रेंगाळायचे नाही अन् तथाकथित सुखालाही कवटाळत बसायचे नाही; आला क्षण फक्त तहेदिल जगत राहायचा!

जिमची पुस्तकं म्हणजे नरभक्षक वाघांच्या शिकारीसाठी त्याने जंगलातून दिवसरात्र केलेल्या बेजोड भटकंती आणि त्यातून गवसलेल्या निसर्गाच्या अनगिनत अविश्वसनीय अशा रहस्यांची वाचकांना नादावून टाकणारी मालिकाच आहे.

जिम एके ठिकाणी सांगतो- मी जेव्हा नवखा होतो, तेव्हा वाघ किंवा तत्सम प्राण्यांच्या तावडीत सापडलेल्या एखाद्या असहाय जीवाला वाचवायची जीतोड कोशिश करायचो. पण माझे हे नवखेपण फार काळ टिकले नाही. माझ्या लगेच लक्षात आले की, प्राण्याला वाचवण्याचा हा व्यवहार आतबट्ट्याचा आहे. यातून होणारे नुकसानही दुहेरी आहे. कारण गिधाडांच्या आणि वाघांच्या नखांत किंवा दातांत कुजलेल्या मासांचे कण असतात, त्याचे विष बनलेले असते. ते विष वाचवलेल्या प्राण्यांच्या शरीरात भिनायला फारसा वेळ लागत नाही. जंगलात त्यांना

कोणतीही ट्रीटमेंट मिळण्याची सुतराम शक्यता नसते. त्यामुळे ते प्राणी तर मरतातच, पण त्याचबरोबर हातातोंडाशी आलेली शिकार हिरावला गेलेला तो उपाशी जीव मग अधिक त्वेषाने आणखी एक शिकार करतो. यातूनच नाहक दोन बळी जातात. हे उमजल्यापासून मी हा नाद सोडून दिला. माझ्या लवकर लक्षात आले की, निसर्गाच्या या स्वाभविक व्यवहारातील आपली सक्रियता बहुतांश वेळा नुकसानदायी तर असतेच, पण त्याचबरोबर जंगलातील स्वाभाविक रिवाजांच्या आड येणारीही असते.

निसर्गनियमांचे प्राण्यांच्या जगण्याचे हे तत्त्वज्ञान केवढ्या ताकदीने आणि खुबीने मांडून ठेवलेय जिम कार्बेटने! मुळाबरहुकूम आपल्यालाही असे म्हणता येईल की– जगण्याच्या या साऱ्याच प्रक्रियेचा इनॲक्टिव्ह भाग बनून आपण राहिलो, तर जगण्याचे समीकरण खूप सरळ-साधे सोपे होत राहते. म्हटले तर हे खूप साधे, म्हटले तर खूप अवघड. यामुळेच त्याच्या लेखनातून एकाच वेळी जिम हा नेकदिल शिकारी आणि निसर्गाचे सहजी न समजणारे देखणेपण उमजलेला लेखक वाटत राहतो.

नरभक्षक वाघाची शिकार करताना जिमने अनेक प्रसंग केवळ मांडून ठेवले आहेत, त्यावर कोणतेही भाष्य न करता. त्याने दिलेली ही स्पेस वाचकाच्या जीवनातल्या अनेक जागा भरून काढते. मासल्यादाखल एक उदाहरण आवर्जून नमूद करावे वाटते. हा प्रसंग 'दि टेम्पल टायगर ॲन्ड मोर मॅन ईटर्स ऑफ कुमाऊँ' या पुस्तकात आलेला आहे. तो असा...

मुक्तेश्वरच्या नरभक्षकाने मांडलेला उच्छाद आणि भयाच्या छायेत वावरणाऱ्या लोकांना भयातून मुक्त करण्यासाठी जिम निघालेला. मुक्तेश्वरच्या वाघिणीची दहशत एवढी असते की, चार तासांच्या वाटचालीत त्या रस्त्यावर त्याला माणूसच काय– पण चिटपाखरूसुद्धा आढळत नाही. या एकांड्या रस्त्यावरून आठ वर्षांची एक मुलगी आपला बैल घेऊन काकाला नांगरण्यासाठी द्यायला चाललेली असते. एकंदर दहशतीच्या वातावरणातले ते दृश्य जिमला बेजोड वाटते. त्या आठ वर्षांच्या मुलीची रस्त्यात बैलांशी ओढाताण चालू असते. तिला त्या रस्त्याने एकटीने जाऊ देणे जिमला प्रशस्त वाटत नाही, म्हणून तो



तिला काकाच्या घरापर्यंत सोबत करतो. घर आल्यावर ती आठ वर्षांची मुलगी काकाला आवाज देते आणि बैल आणल्याचे सांगते. काका झोपडीतून बाहेर न येताच तिला उत्तर देतो, ''पुतळा, मी जेवायला बसलोय बैल खुट्याला बांध आणि सरळ घरी जा.'' पुतळा बैल बांधते आणि घराकडे निघते. अर्थातच जिम तिला घरापर्यंत सोबत करतो. जिम स्वतः येथे काहीच कॉमेंट करत नाही, पण वाचकाचा तळखोल अगदी ढवळून काढतो. जिमने मांडून ठेवलेला हा प्रसंग वाचक 'इन द लाईन' तर वाचतोच... 'इन बिटवीन द लाईन'ही वाचतो; एवढेच नव्हे, तर त्यापलीकडे जाऊन 'बियॉन्ड द लाईन'ही वाचतो. हा प्रसंग वाचल्यावर आपले मन अनेक शक्यता पडताळून पाहत राहते. सैनिकसुद्धा ज्या रस्त्याने एकटे प्रवास करत नाहीत, अशा नरभक्षक वाघाच्या प्रदेशात त्या इनमिन आठ वर्षांच्या लेकराला बाप कसे काय पाठवतो? त्या मुलीचा काका साधा झोपडीच्या बाहेरही न येता तिला वाटेला कसा काय लावू शकतो? वगैरे वगैरे. जिमच्या जगण्याची आणि लिखाणाची ऐपत एवढी मोठी की– या प्रसंगावर कोणतीही कॉमेंट न करता त्या मुलीला घरापर्यंत सोबत करून जिमने फार मोठी कॉमेंट केलेली असते. निसर्गाच्या सततच्या वावरातून ही मूक सोबतीची दीक्षा जिमला मिळालेली असते की काय?

ज्या कॉर्बेटकडून अनेक नरभक्षक वाघ मारले जातात, तो ठामपणे असे सांगतो की, एरवी वाघ तसा खूप चांगला प्राणी आहे. तो माणसाकडे विनाकारण ढुंकूनसुद्धा पाहणार नाही. हे ऐवज आपल्या लायकीचेच नाही, ही अंगभूत जाणीव त्याला मुळातच असावी. म्हणूनच की काय, अनेक वाघांचा वावर असलेल्या या जंगलात हजारो माणसे निर्धोकपणे भटकत असतात. माणसांपेक्षा वाघावर असलेला हा अतिरिक्त विश्वास तर त्या बापात मुलीला एकटंच सोडण्यात दडलेला नसेल ना? का आपल्या मालकाला सोडवण्यासाठी बेलाशकपणे वाघावर चाल करून गेलेल्या गाईंची उदाहरणे सोबतीला असल्यामुळेही सोबतच्या बैलावर– म्हणजे पुन्हा प्राण्यावरच– बापाचा अपार विश्वास असेल का? हाही विचार मनात तरळून जातो. वाघ नरभक्षक झाला असेल, तरच विपरित वागतो आणि त्याचे तसे वागणे हा अपघात व केवळ नाइलाजच असतो. आपल्याला येईल असे सभोवाराला किंवा प्राण्यांना समजून घेणे?

'द बॅचलर ऑफ पोवाळगड'च्या व नरभक्षकाच्या शिकारीची कथा तर केवळ अद्‌भुत या सदरात मोडणारी अशीच. हा वाघ 'ओव्हर द कर्व्हज' (नाकाच्या शेंड्यापासून शेवटच्या टोकापर्यंत लांबी) साडेदहा फूट एवढा अवाढव्य होता.

अवघ्या काही यार्डांवरून मारलेल्या कॉर्बेटच्या गोळीने कवटीचा एक तुकडा तुटूनही हा जिगरबाज वाघ त्याला दोन दिवस झुंजवत होता अन् एकटा बेडर जिमही त्याच्याशी जीव पणाला लावून झुंजत होता. वाघाने एवढे थकवल्यावर, जीवावर उठल्यावरही तो गतप्राण झाल्यावर जिम त्याच्या रुबाबदारपणाचेच वर्णन करीत राहतो– न थकता. तेव्हा आपल्यासाठी माणूस व प्राणी यांच्यातील ती जीवघेणी लढाई न राहता एका नेक कॉजसाठी केली गेलेली शिकार– या देखण्या रूपातच चिरकाल स्मरणात राहते.

रॉबिन या त्याच्या इमानी कुत्र्याशी असलेल्या नातेसंबंधाचा उल्लेख केला नाही, तर ती ना-इन्साफीच ठरेल. प्रत्येक जीवघेण्या प्रसंगांत या मुक्या जीवाने कॉर्बेटला प्राणपणाने साथ दिलेली असते. उभ्या आयुष्यात फक्त एकदा अणि एकदाच जिकिरीच्या प्रसंगी रॉबिन त्याची साथ सोडतो. त्याप्रसंगी त्या मुक्या जीवाची झालेली तगमग आणि नेकदिल जिमने बाराखडीतल्या एकाही अक्षराची मदत न घेता घातलेली समजूत अफलातून अन् त्याच्याच शब्दांत ऐकावी अशीच! तो अख्खा प्रसंग त्याच्याच शब्दांत...

रॉबिन आणि मी इतकी वर्षे एकत्र शिकारी केल्यात, या काळात मी अडचणीत रॉबिनने असताना फक्त एकदाच पळ काढला होता. एकमेकांपासून अलग होण्याच्या त्या विशिष्ट क्षणानंतर त्याचा उतरलेला चेहरा आणि खाली पडलेले कान बरेच काही सांगून गेलेले. त्याच क्षणी आम्ही दोघांनी मूकपणे ठरवून टाकलं की, झालं-गेलं विसरून जायचं आणि त्याचा उल्लेख कधीही करायचा नाही. पण आता आम्ही दोघेही म्हातारे झालो आहोत आणि तितकेसे हळवे राहिलेलो नाही. मी हे लिहीत असताना तेरा वर्षांचा रॉबिनमाझ्या पायाशी अखेरच्या शय्येवर पडून राहिलाय. त्याने त्याच्या लबाड व तपकिरी डोळ्यांनी आणि छोटीशी शेपटी हलवून मला ती गोष्ट सांगायला 'ना-हरकत' दिली आहे.

केवढे अविश्वसनीय हे सगळं! 'मॅन ईटर्स ऑफ कुमाऊँ' या पुस्तकाच्या पानापानातून रॉबिनने कॉर्बेटचा चाटलेला

चेहरा आणि घशातल्या घशात काढलेला आवाज घुमत राहतो.

'ठाक'मधील जिम कार्बेटच्या शेवटच्या नरभक्षकाच्या शिकारीचा प्रसंगही थरारक असाच आहे. निसर्गाचे माहीत असलेले तपशील, त्याचा योग्य वेळी केलेला नेमका वापर यातूनच ही अविश्वसनीय अशी शिकार घडते. जिमला आपला नेक सलामही आपसूकच घडतो. ठाकची नरभक्षक वाघीण जिमला अनेक वेळा गुंगारा देते. प्रत्येक वेळी लढाईत त्याला वरचढही ठरते. जंगलातल्या आपल्या रुतब्याची पदोपदी जाणीव करून देते. तो शहारे आणणारा प्रसंग असा- वाघीण जिमपासून फक्त मैलभर अंतरावर असते, तिचे कॉल्स जिमला सारखे ऐकायला येतात. मैलभर अंतरावर असलेल्या त्या वाघिणीच्या हालचाली जिमला तंतोतंत उमगत असतात. जणू पाढे पाठ असावेत त्यागत जिमला जंगल पाठ झालेले असते. वाघीण कोणत्या मार्गाने त्या दिशेला येणार याचे जिमचे ठोकताळे निश्चित झालेले. इथपर्यंतच्या साऱ्या गोष्टींवर आपण आपल्या इमॅजिनेशनला स्ट्रेच करत विश्वास ठेवत राहतो. पण त्याच्यापुढची जी मूव्ह तो करतो, ती केवळ जिम कॉर्बेटच करू शकतो. वाघाचा मीलनकाळ आहे याचे भान आणि नरभक्षक वाघीण कामातूर झालेली आहे, हे जिमच्या ध्यानात येते. आता हे नेमके कोणते इंद्रिय आहे- ज्यातून ही जाणीव त्याला झालेली असेल, या फंदात वाचकाने पडू नये, कारण ते जाणून घ्यायचे असेल तर केवळ पुस्तकं वाचून भागणार नाही, त्यासाठी कॉर्बेटसारखे जंगलातील पानन्पान वाचावे लागेल. कोणत्याही परिस्थितीत वाघिणीला आता आपल्या तावडीतून सुटू द्यायचे नाही, या जाणिवेतून तो एक शक्कल लढवतो. ती अफलातून या सदरात मोडणारी तर असतेच, पण प्रसंगी जीवघेणीसुद्धा ठरू शकते. आपल्या फुप्फुसात हवा भरून जिम त्या वाघिणीला हुबेहूब वाघाच्या आवाजात कॉल देत राहतो. वाघीण पण त्या आवाजाला चकून कॉल देत-देत त्याचा मागोवा घेत राहाते. ज्या सादेला वाघीणही भुलावी, केवढी मोठी तपश्चर्या उभी असेल त्या सादेमागे! मेटिंगसाठी अनावर झालेल्या त्या वाघिणीचे कॉल्स जवळजवळ येत राहतात. हा प्रसंग वाचताना वाचकाच्या अंगावर काटे उभे राहतात, एवढे मोठे धाडस करतो आहे जिम. कामातूर झालेली ती वाघीण नर वाघाऐवजी जिमला पाहून केवढी



चवताळली असेल याची कल्पनादेखील आपण करू शकणार नाही. वाचकाला जाणवत राहते ते एवढेच की- तो त्या वाघिणीला नाही, तर साक्षात आपल्या मृत्यूलाच जणू कॉल देतो आहे! वाघीण आवाजाचा माग काढत-काढत त्याच्या समोर येऊन उभी राहाते. नर वाघाऐवजी कॉर्बेटला पाहून वेडीपिशी होते. चवताळून ती त्याच्यावर झेप घेणार एवढ्यात आपला आयुष्यभराचा तजुर्बा पणाला लावून तो तिला गोळी घालतो. ती चवताळलेली वाघीण धराशायी होते. या जीवघेण्या लढाईत सूतभर जरी अंदाज चुकला असता, तर ही गोष्ट सांगायला जिम शिल्लक राहिला नसता. एवढी भयावह असते ती लढाई, काळजाचं पाणी-पाणी करणारी.

शेवटचा नरभक्षक वाघ मारल्यानंतर जिम कार्बेट जे काही काळजातले बोलतो, ते थेट आपल्या काळजातच उतरते. तो म्हणतो, 'मला ज्या काही गोष्टी तुम्हाला सांगायच्या होत्या, त्या सांगून झाल्या आहेत. या वाघिणीच्या मृत्यूबरोबर नरभक्षक वाघांना मारण्याची माझी कारकीर्द आता संपलेली आहे. बरीच वर्षे मी हा धोकादायक खेळ खेळलो. एवढ्या वर्षांत कधी कधी तर माझ्या आयुष्याचे दोर कापले जाण्याचे बाके प्रसंगही आले. पण प्रत्येक वेळेला मी स्वतःच्या पायावर चालत परत आलो. माझ्या एका गोळीमुळे एका जरी माणसाचा जीव वाचला असेल, तर ते माझ्यासाठी फार मोठे बक्षीस आहे. त्याचे मोल मी कधीही करू शकणार नाही.'

अख्खा जिम कॉर्बेट जेव्हा आपण वाचून संपवतो, तेव्हा निसर्गाविषयी एक नम्र भाव त्याच्या शब्दांमधून झिरपत-झिरपत आपल्यापर्यंत शंभरदा येऊन पोहोचतो. जाई-जुईच्या वेलीवरून पडणारे फूल जसे अलगदपणे स्वत:शीच गिरक्या घेत खाली पडते, जणू गुरुत्वाकर्षणाचे कोणतेही नियम त्याला लागू नसावेत- बरेचसे त्यागतच. जिम कॉर्बेटची पुस्तकं वाचल्यावर निसर्गातील काही रहस्यं आपल्यासमोर अलगदपणे उलगडत जातात. वेलीवरून फुलाचे ते पडणे आपणास सांगून जाते की- जितके हलके व्हाल तेवढे अलगद पडाल, इगोच्या वजनाने जड झालात की धप्पकन खाली पडाल. तंतोतंत असेच काहीसे चिंतन हा शिकारी लेखक आपल्या लिखाणातून आपल्यासमोर सहजी मांडत राहतो. शेवटच्या नरभक्षक वाघिणीला मारताना स्वतःलाच तिचे आमिष म्हणून पेश करणारा हा लेखक वाचकांच्या काळजाचा ठाव घेत राहतो.

दि.२५ जून १८७५ ला जन्मलेला जिम कॉर्बेट १९ एप्रिल १९५५ रोजी काळाच्या पडद्याआड गेला. कोणताही अभिनिवेश न दाखवता (त्याच्या साहसामुळे कदाचित तो अभिनिवेश त्याला शोभूनही दिसला असता) त्याने लिहून ठेवलेल्या या नोंदी पुढील कित्येक पिढ्यांना समृद्ध करीत राहतील. त्याची ही पुस्तके म्हणजे जंगल कसे वाचावे याची बाराखडीच वाटत राहतात. जंगलातील दृश्य, आवाज व हालचाली जित्या-जागत्या करून वाचकासमोर मांडण्याची त्याची हातोटी विलक्षण अशीच आहे. जिम कॉर्बेटसारखी निसर्ग वाचण्याची करामत आपल्याला कधीही साधणार नाही; पण किमान जिम कॉर्बेट जरी आपल्याला वाचता आला, तरी आपल्या निसर्गविषयक आकलनात फार मोलाची भर पडलेली असेल. निसर्गासाठी नाही, तर बरीचशी आपल्या अस्तित्वासाठीच... एकदा अपरात्री जंगलातून तो गोठ्यात येऊन झोपतो, त्या जनावरांना आपलेसे करून- इतके आपलेसे की, काही वेळाने गोठ्यातली गाय वात्सल्याने थकल्या-भागल्या कॉर्बेटच डोकं चाटायला लागते. त्या क्षणी वाचकाला जंगल, प्राणी आणि कॉर्बेट हे अगदी परस्परांचे पर्यायी शब्दच वाटत राहतात.

वाचकांच्या डोक्याच्या कक्षा सर्वार्थाने रुंदावणारे लेखक बरेच असतात, पण जिम कार्बेट मात्र वाचकांचे आसमान उंचावणारा लेखक म्हणून पिढ्यान्‌पिढ्या हस्तांतरित होत राहील- अगदी विनासायास...!

**मनोज बोरगावकर**
Mob. 9860564154

**संदर्भ :-**

मॅन ईटर्स ऑफ कुमाऊँ-१९४४
दी मॅन ईटिंग लेपर्ड ऑफ रुद्रप्रयाग-१९४७
जंगल लोअर-१९५३
दी टेंपल टायगर अॅन्ड मोर मॅन ईटर्स ऑफ कुमाऊँ-१९५४.

गांधींचे गारूड

संजीवनी खेर



# दिल तो पागल है...

त्यागाचीही नशा चढते की काय, कोण जाणे? आजच्या चंगळवादाच्या दुनियेत जुन्या निरुपयोगी वस्तू टाकणेही जिथे जिवावर येते, तिथे आपले राजवैभव त्यागून कुणी झोपडीवासीयांचे अश्रू पुसायला बाहेर पडेल; हे कथा-कादंबऱ्यांत वा पुराणकथांतच वाचायला ठीक वाटते. पण काही काळापूर्वी हे घडत होते. कुणा एकाची जीवनकथा वाचून वेड्या देशी-विदेशी तरुणी या भणंग देशात येऊन कामं करत होत्या. दंतकथा वाटाव्यात अशाच या कथा आहेत. काहींच्या हकिगती तुम्ही वाचल्यात. आज एका राजकुमारीची कथा वाचू या. कपूरथळा या पंजाबमधील समृद्ध राजघराण्यात जन्मलेली अमृतकौर (जन्म- १८८९, मृत्यू- १९६४) ही सात भावांची एकुलती एक लाडकी बहीण होती. अत्यंत देखणी नि हुशार. तिचे वडील राजा सर हरनामसिंग यांच्यावर त्यांच्या लहानपणचे शिक्षक रेव्ह. वुडसाइड यांच्या ख्रिश्चन धर्माच्या तत्त्वांचा खूप गहिरा परिणाम झाला आणि समजत्या वयात त्यांनी राजगादीशी आपला संपर्क तोडला. ते जालंधरला राहू लागले. तिथे रेव्ह. गोकलनाथ यांनी हरनामसिंगना दीक्षा दिली. रेव्हरंडच्या मुलीशी हरनाम यांनी विवाह केला. त्यांची पत्नी प्रिस्किला गोकलनाथ ही स्वत: बंगाली प्रेसबेटेरियन होती. ही मंडळी अत्यंत शिस्तशीर नि कडक नैतिकता पाळणारी असतात. लहान वयातच- बाराव्या वर्षी अमृतकौरला उच्च शिक्षणाकरिता ऑक्सफर्डला (यू.के.) पाठवण्यात आले. ती खेळात निपुण होती. हॉकी, क्रिकेट आणि टेनिस ह्या खेळांची कप्तान असायची. वयाच्या एकविसाव्या वर्षी ती हिंदुस्थानात परतली. इथं आल्यावर तिने अविवाहित राहून आपले सारे आयुष्य देशसेवा आणि महिलांच्या उद्धारासाठी काम करण्यात घालवलं. स्त्रियांमध्ये काम करणं तिला आवश्यक वाटत होतं, कारण तेव्हा स्त्रियांची स्थिती फार करुण होती. बालविवाह, सासरी छळ, संपत्तीत हिस्सा न मिळणे, शिक्षणाचा अभाव यामुळे त्यांचे जीवन केवळ दु:खमय असे.

ऑक्सफर्डहून हिंदुस्थानात परत येताच तिने ऑल इंडिया वुमेन्स कॉन्फरन्ससह काम करायला सुरुवात केली. हे व्यासपीठ तिच्या गुणांना आणि कल्पनांना वाव देणारं ठरलं.

गांधीजींच्या विचारांचे अनुसरण करून खेड्यांच्या विकासाच्या-आरोग्याच्या अनेक योजना अमृताजींनी आखल्या, तडीस नेल्या. गांधीजींची शेवटच्या बारा-तेरा वर्षे त्या त्यांचे खासकरून विदेशी लोकांशी असलेले पत्रव्यवहार हाताळत असत. याखेरीज देशी राजेरजवाड्यांशी त्यांचा जवळचा संबंध असल्याने त्यांचे म्हणणे ते लोक शांत मनाने ऐकून घेत. अमृताजींमध्ये लोकांना जिंकून घ्यायची सुरेख हातोटी होती. त्या समोरच्याला आपल्या विचारांशी पाहता-पाहता सहमत करून घेत असत. गांधींजींचा अमृताजींच्या या गुणावर संपूर्ण विश्वास होता. त्या दोघांमध्ये परस्पर-सामंजस्याचा एक सुप्त गुण होता. गांधींची माणसांची निवड, त्यांच्याबद्दलचे ममत्व, विश्वास, अनुकंपा, प्रेम केवळ अतुलनीय होतं. जगात क्वचितच कुणी नेता असेल, ज्याचे सामान्य आणि असामान्यांशी इतके आपुलकीपूर्ण व्यवहार असतील. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर जेव्हा बंगालमध्ये ते दंगापीडितांमध्ये हिंडत होते, एकांड्या हिमतीने भिडत होते, संघर्ष करीत होते; तेव्हाही आपल्या माणसांना पत्र लिहायला ते वेळ काढत होते.

काही काळानंतर ती त्याची प्रमुखही बनली. तिचे भाऊ अत्यंत विद्वान आणि प्रतिष्ठित होते. एक- सरकार-दरबारात उच्च अधिकारी होता. दुसरा- पंजाब हायकोर्टात न्यायाधीश होता. तिसरा- मुंबईचा गव्हर्नर होता. चौथा- डॉक्टर. तिची राहणी साहजिकच राजेशाही होती. सिल्कच्या साड्या नि मोजके पण मौल्यवान दागिने ती सतत वापरत असे. तिच्याबरोबर नेहमी तिचा सेवक असे. गांधीजींना तिने प्रथम पाहिले नि ऐकले ते मुंबईत. इंडियन नॅशनल काँग्रेसच्या अधिवेशनात ते बोलले होते. त्या काळी ते नुकतेच दक्षिण आफ्रिकेहून परतले होते. त्या भाषणाने राजकुमारी खूपच प्रभावित झाली. शाही राहणी सोडून ती शाकाहारी झाली, खादीधारी झाली, पण त्यातही मऊ झुळझुळीत साड्या तिला आवडत असत. खरोखरच एक रॉयल देखणेपण आणि आब तिच्या बोलण्या-वागण्यात असे.

त्यानंतर बराच काळ गेला नि राजकुमारी अमृतकौरनी सेवाग्रामला आश्रमात जाऊन गांधीजींचे काम पाहिले. त्यांचे विचारांचे अनुसरण करायचे विचार तिच्या मनात येत होते. राजेशाही वातावरण सोडून तिने कुटियात राहायला जावे, हे राजघराण्याला स्वातंत्र्य चळवळीत रस असूनही पचवणं अवघड होतं. त्यातच ही लाडाकोडात वाढलेली, विदेशात शिकलेली मुलगी, प्रकृतीने नाजूक, गरिबीत कशी राहील, याची चिंता. तसंच, वर्ध्याचा उन्हाळा तिला मानवलाच नसता. या साऱ्या काळज्यांमुळे हे पाऊल उचलायला घरच्यांची नाराजी होती. गांधीजींनी तिला सांगितले, ''त्यांना दुखावून तू या कामात येऊ नकोस. त्यांची सेवा हा तुझा पहिला धर्म आहे. तुला पटलेले काम तू तुझ्या वातावरणात राहूनही करू शकतेस, तसे कर. त्यासाठी आश्रमात येऊन राहायची गरज नाही.'' तिने आपल्या आजारी आईची सेवा मनोभावे केली. तिच्या जाण्यानंतर गांधीजींनी तिला तिच्या एकाकी पडलेल्या वडिलांकडे लक्ष द्यायला सांगितले. त्यांच्या निधनानंतरच ती गांधी आश्रमात गेली. ती कायमस्वरूपी तिथे राहत नव्हती. आपल्या नेमलेल्या वा आवडणाऱ्या कामाच्या ठिकाणी राहून आरंभी काम करीत राहिली.

त्या काळी स्वत: बापूजी वऱ्हांड्यात जेवायला सर्वांसमवेत बसत आणि ते सर्वांना पहिले अन्न वाढत असत. राजकुमारीबरोबर तिचा सेवकही असे. आपल्या राजकन्येसह एकाच पंक्तीत बसायला त्याला संकोच वाटे. तो एका कोपऱ्यात जाऊन उभा असे. पण इथले सगळे तंत्रच वेगळे होते. त्याला सर्वांबरोबर बसायला सांगत. हळूहळू तोही त्या साध्या राहणीमानात रुळला. अमृतकौर परिवाराच्या दिल्ली, पतियाळा, सिमला इत्यादी ठिकाणी आलिशान कोठ्या प्रासादतुल्य बंगले होत्या. पुढे-पुढे गांधीजी दिल्लीला गेले की, गव्हर्नरच्या बंगल्याऐवजी राजकुमारी अमृतकौरच्या बंगल्यावर तिचे आदरातिथ्य घ्यायला उतरत असत. ती पाहुण्यांच्या आवडी-निवडी लक्षात ठेवून त्यांच्या खानपानाची व्यवस्था करीत असे. त्यांच्या आरामाची काळजी घेत असे. पुढे तर महादेवभाई देसाई आणि त्यांची पत्नी व मुलगा यांना तिने आपल्या सिमल्याच्या बंगल्यावर राहायला बोलावून त्यांची सेवा केली होती.

तिला राजकारणात रस होता. तिचे राजकारणातले पहिले गुरू होते गोपाळकृष्ण गोखले. ते वडिलांचे, सर हरनामसिंग यांचे परमदोस्त होते. त्यांच्या प्रासादात त्यांचे येणे-जाणे वारंवार असे. त्यांचे राष्ट्रभक्तिपर सांगणे-बोलणे अमृतजी ऐकत असत, प्रभावित होत असत. आपल्याही हातून असेच काही भव्य-दिव्य व्हावे, असे त्यांना-अमृताजींना- वाटत असे. मनात येणाऱ्या शंका त्या गोखलेकाकांजवळ मोकळेपणाने व्यक्त करीत असत. तेही लहान वय म्हणून थातुरमातूर उत्तरे देऊन टाळत नसत. परकीय सत्तेबद्दलचा राग त्यांच्या वक्तव्यातून पुराव्यानिशी समोर आला की, कुणालाही ते कळत असे. त्यांच्याच तोंडून गांधीनामक गारुड्याची जादू दक्षिण आफ्रिकेत कशी चालली, हे कळले होते. 'हा माणूस हिंदुस्थानातही करामत करून दाखवील', हे गोखले यांचे शब्द अमृताजींच्या हृदयावर कोरले गेले. गांधीजींच्या प्रत्यक्ष भेटीनंतर त्यांना या जादूचा प्रत्यय आला.

देशात घडणाऱ्या अनेक घटनांनी अमृताजींचे मन नि मत बंडखोरी करायला उद्युक्त होत असे. शीख रक्त होते ना! बलिदानाचा इतिहास होता. धर्म बदललेला असला तरी संस्कृती जाज्वल्य होतीच. त्या काळात जालियनवाला बागेत ब्रिटिश सैनिकांनी चारशे हत्या केल्या होत्या. हे पाहून-ऐकून ब्रिटिश सत्तेच्या अन्यायाबद्दल त्यांच्या मनात तिळभरही शंका राहिली नाही. त्यांनी बापूंचे काम पंजाबमध्ये सुरू केले. विणकरांना एकत्र करायला, स्त्रिया नि मुलींना आपल्या पंखाखाली घेऊन शिकवायला सुरुवात केली. ब्रिटिश आपले शत्रू आहेत, त्यांच्याशी लढायचेय;

पण ते नव्या शस्त्राने– अहिंसेच्या, असहकाराच्या. तलवारीवर वाढलेल्या समाजाला अहिंसा समजावणं सोप नव्हतं. गांधींच्या हे केव्हाच लक्षात आलं होतं की– प्रसिद्धीच्या वलयात काम करायला, त्या वलयात राहून सेवा करायला तिथे येणाऱ्या स्त्रियांना आवडत असे. पण हे त्यांचे येणे–वागणे गांधींना अडचणीचे नि कामात बाधा आणणारे वाटू लागले होते. ज्या कामात त्यांना स्त्रियांचा सहभाग हवा होता, ती कामं व्हावी तशी होत नव्हती.

अमृताजी जालंधरमध्येच राहून सिमल्यात ये–जा करत, जिथे गांधीजी कामानिमित्त येत असत. त्यामुळे भेटी होत, कामाबद्दल चर्चाही करता येई. जालंधरमध्ये त्यांनी अस्पृश्यतानिवारण, चरखा, ग्रामसुधार, स्वच्छता अशा गोष्टींकडे लक्ष पुरवायला सुरुवात केली. त्यात चांगले यश येऊ लागले. तशीही अमृताजींच्या नाजूक तब्येतीची त्यांचे भाऊ शुम्मी यांना फार चिंता वाटत असे. ती दूर करायला गांधीजी अमृताजींना सिमल्याला पिटाळत असत. शुम्मींचा सल्ला घेऊनच उपचार घ्यायचा सल्ला देत. त्यातही गांधीजींचे स्वत: प्रयोग करून सिद्ध केलेले निसर्गोपचारदेखील असत. सर्व पातळीतील स्त्रियांनी राजकारण नि समाजकारणात हिरीरीने भाग घ्यावा, असे गांधीजींना वाटत असे. कारण स्त्रियांच्या आंतरिक शक्तीवर त्यांचा विश्वास होता. स्त्रियाच अधिक समर्थपणे अहिंसा राबवू शकतील, असा त्यांचा दृढ विश्वास होता. आपल्यासारख्या देशात– जिथे स्त्रियांना पायातली जुती समजलं जाई– स्त्रीनं मुलं पैदा करावीत नि घरच्यांना खूश ठेवावं एवढीच त्यांची लायकी, असा पक्का समज होता; तिथे त्यांना थेट राजकीय व्यासपीठावर आणण्याचं धाडस हाच माणूस करू जाणे. त्यामुळे स्त्रियांत कमालीचे धैर्य जागे झाले. एका स्त्रीत असते तसे मार्दव गांधीजींत होते. सेवा करणे, स्वच्छता, घरकाम करणे इत्यादींसारख्या गोष्टीत त्यांना रस होता. किंबहुना, कुठलेच काम त्यांच्या दृष्टीने क्षुल्लक नव्हते. एका जगप्रसिद्ध नेत्याने हे केवळ प्रतीकात्मक नव्हे तर सच्च्या दिलाने केले. यातील पारदर्शिता सामान्यांच्या नजरेतून सुटली नव्हती. सत्य हाच त्यांचा देव आहे नि धर्म आहे, हे सांगणे नि जगणे हे अखंड जगाच्या डोळ्यांत अंजन घालणारे नवे तत्त्वज्ञान होते. कुठल्याही धर्माला ते अमान्य होणे शक्य नव्हते.

गांधीजींच्या दांडी मार्चमध्ये भाग घेतल्याबद्दल त्यांना अटक झाली होती. त्यानंतर त्यांना जेलची हवा अनेकदा



खावी लागली होती. ते वैयक्तिक गौरवाचे चिन्ह असे. अमृताजींना जेव्हा ‘हाऊस अ‍ॅरेस्ट’ झाली, तेव्हा त्या सिमल्यात होत्या. सरकारचे हे अन्याय्य वागणे पाहून एका संवेदनशील आय.सी.एस. अधिकाऱ्याने- श्री.मून यांनी सरकारच्या चुकीच्या न्यायपद्धतीचा निषेध म्हणून राजीनामा दिला. सरकारने कित्येक निरपराधांना शिक्षा दिल्या, फासावर चढवलं, हा ब्रिटिश न्याय नव्हे, हे त्याने नोंदवले होते. अमृताजींनी गांधींजींची सेक्रेटरी म्हणूनही अनेक वर्षे काम पाहिले होते. एकोणीसशे तीसमध्ये त्या बन्नू-अफगाण-पख्तून इलाका- इथे शांतता मिशन घेऊन गेल्या होत्या, तर सरकारने त्यांना देशद्रोहाच्या कायद्याखाली अटक केली. त्याचा लोकांत राग धुमसू लागला.

गांधीजींच्या विचारांचे अनुसरण करून खेड्यांच्या विकासाच्या-आरोग्याच्या अनेक योजना अमृताजींनी

## राजकुमारी अमृतकौर आणि गांधी यांच्यातील पत्रव्यवहार

अहमदाबाद
सतरा दोन छत्तीस

प्रिय येडचाप मुली,

तुझी पत्रं मला नेहमीच तुझ्या बंडखरीची जाणीव देत असतात. तू येडी आहेस म्हणूनच बंडखोर आहेस. किंवा बंडखोर आहेस म्हणून वेडी आहेस. तुझं पत्र मिळालं. तुझा वेडेपणा फारसा चालू देता कामा नये, हे माझ्यासारख्या जुलमी माणसाला चांगलंच कळतं. तू तुला वाटेल तेव्हा वर्ध्याला येऊ शकतेस. आम्ही सध्या सावली या गावी आहोत. हे गाव वर्ध्याहून दिडशे मैलांवर आहे. तिथं सध्या एक अधिवेशन सुरू असल्याने गांधीसेवा मंडळाचे शंभरएक लोक जमलेले आहेत. चार-सहा दिवसांतच आम्ही दिल्लीला जायला निघू. तू तिकडेच येऊ शकतेस. माझ्याबरोबरच राहा. मी तसे त्यांना कळवून टाकतो.

काल मी विद्यापीठाहून दीड मैल चालत हरिजन संघापर्यंत गेलो. तसा थकवा जाणवत नाहीय. तिथे मला घनिराम आणि त्याचा मुलगा भेटले. दोघेही खूप चांगले काम करीत आहेत. मी त्यांना तिथेच राहायला सुचवले आहेत. त्यांच्याकडे अनेक चांगल्या कल्पना आहेत. जे वर्कशॉप बारडोलीला होते, ते आता वर्ध्याला आणले गेले आहे. त्यामुळे त्यांचे कामही सोपे होईल. लक्ष्मीदासला तू ओळखतेसच. त्या पिता-पुत्रांना तो त्यांना मदत करतोय.

कांती आणि कनु माझ्या गरजांकडे ध्यान ठेवून आहेत. मनुबेन त्यांच्यावर देखरेख करतेच आहे. मागे तुला लिहिले होते की, हरिजनांना समजावं की- त्यांनी सुधारायचं, बदलायचं म्हणजे उच्चवर्णीयांसारखे व्हायचं नाहीय. उच्चवर्णीयांत असलेल्या अनेक वाईट रूढी आणि सवयी त्यांच्यात येऊ घातल्या आहेत. त्याबाबत सतर्क राहायला हवे.

तुझा, जुलमी बापू

**ता.क :** तू खेळात वेळ घालवण्यापेक्षा गावाकडे लक्ष देत आहेस, हे बरे आहे.

लखनौ
आठ चार छत्तीस

माझ्या प्रिय बंडखोर मुली,

तुझ्या प्रकृतीबाबत तू मला तारेने कळव. तुला सारखी सारखी सर्दी होते, हे चांगले लक्षण नाही. त्यावर तू अधिक नैसर्गिक उपचाराचा प्रयोग करायला हवा. तुझ्या वैयक्तिक  बाबींत माझी सूचना अशी आहे की- तुला जी सारखी खाज येते, रॅश येतो त्यावर उपाय म्हणून तू तुझी सिल्कची अंतर्वस्त्रं वापरणे थांबवावे. तुझ्या कोमल त्वचेला त्यामुळे त्रास होत असणार. याखेरीज तुम्ही लोकं साबणाने, फेसवॉशने तोंड वारंवार धुता, शरीर धुता, त्याचाही विपरीत परिणाम नाजूक त्वचेवर होत असणार. परिणामतः तुला सारखी सर्दी होत असणार. कारण हा अतिरिक्त साबणाचा वापर, नैसर्गिक तेल नि त्वचेचे संरक्षण घालवून टाकतो. तुझ्या भावाशी- शुम्मीशीही त्याबाबत बोल आणि त्याच्यातील फिजिशियनही माझ्या मताशी सहमत असेल, तर आपल्या वापरात एकदम नको पण हळूहळू बदल कर.

आखल्या, तडीस नेल्या. गांधीजींची शेवटच्या बारा-तेरा वर्षे त्यांचे खासकरून विदेशी लोकांशी असलेले पत्रव्यवहार हाताळत असत. याखेरीज देशी राजेरजवाड्यांशी त्यांचा जवळचा संबंध असल्याने त्यांचे म्हणणे ते लोक शांत मनाने ऐकून घेत. अमृताजींमध्ये लोकांना जिंकून घ्यायची सुरेख हातोटी होती. त्या समोरच्याला आपल्या विचारांशी पाहता-पाहता सहमत करून घेत असत. गांधीजींचा अमृताजींच्या या गुणावर संपूर्ण विश्वास होता. त्या दोघांमध्ये परस्परसामंजस्याचा एक सुप्त गुण होता. गांधींची माणसांची निवड, त्यांच्याबद्दलचे ममत्व, विश्वास, अनुकंपा, प्रेम केवळ अतुलनीय होतं. जगात क्वचितच कुणी नेता असेल, ज्याचे सामान्य आणि असामान्यांशी इतके आपुलकीपूर्ण व्यवहार असतील. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर जेव्हा बंगालमध्ये ते दंगापीडितांमध्ये हिंडत होते, संतप्त जमावाशी एकांड्या

खुर्शिद आणि पेरीन इथे आलेल्या आहेत. त्यांच्याशी बोलून शाल आणि चाकूची किंमत ठरवू. फार महाग नको. तू पाठवलेला मेमो मी त्यांच्याकडे सोपवला आहे. सहाशे रुपयांहून अधिक किंमत नसावी. आता त्यांना जे योग्य वाटेल ती किंमत निश्चित होईल. प्रभा माझ्या बाजूलाच बसलेली आहे.

तुझा, **बापू**

नंदी हिल्स
चौदा पाच छत्तीस

माझ्या लाडक्या वेडपट मुलीस,

तुझं वागणं हे तुझ्या जुलमी बापूला आवडणं शक्य आहे? तुला खेचूनच ह्या सुंदर शांत नंदी हिलमध्ये आणायला हवं होतं. इथली शांत-स्वच्छ हवा... आवाजाचा त्रास नाही. सौंदर्य तर उतू जातंय चहू बाजूंनी. देखणे टेनिस कोर्ट, धुळीचा कणही दृष्टीस पडत नाही. रेखीव पाथवेज. कुठलेही सामाजिक समारंभ नाहीत. पण हे सारे जुलमी माणूस तुला कसे पटवू शकणार? हे सारं मी तुला कसे सांगणार? राहा तू धुळीनं माखलेल्या सिमल्याच्या वातावरणात. मी तुझ्यावर जुलूम-जबरदस्ती तर नाही ना करू शकत? वेड्या बंडखोर मुली, पुढच्या पत्रापर्यंत तुझी प्रकृती छान झालेली असेल नि जेव्हा सेगावला सेवाग्रामचे जुने नाव येशील तेव्हा तुझ्या मदतीला नबी असेल. कु आणि शांता आता बऱ्या झाल्या आहेत. लांब-लांबवर फिरायलाही जाऊ शकतात. असो.

तुझा, जालीम बापू

पण त्याला आता काही अधिकार नाहीत.

वर्धा
अठ्ठावीस पाच छत्तीस

प्रिय बंडखोर मुली,

मी आत्ता ट्रेनमध्ये शिरायच्या गडबडीत हे पत्र लिहीत आहे. तुझ्या प्रकृतीची चिंता मला सतावत असते. माझ्यासमोर तू अगदी आज्ञाधारक असल्याचे दाखवतेस, पण माझ्यामागे मात्र तुझं बंडखोर मन हवं तसंच करतं. अशा वेळी हा जुलमी काय करू शकणार? यावर एकच उपाय आहे. तो म्हणजे, लवकरात लवकर बरी हो. जर मासे खाऊन तुझी तब्येत सुधारणार असेल, तर तू नक्की ते खा. शुम्मी मला काहीही बोलला तर मी ते मनावर घेणार नाही. कारण त्याला जर असे वाटत असेल की, माझ्यामुळे तुझी प्रकृती खालावली आहे तर त्याला तसे वाटणे साहजिक आहे. त्याची तुझ्यावर खूप माया आहे. एका परीने त्याने तुला वाढवले आहे, त्यामुळे त्याला रागवायचा अधिकार आहे. तू लवकरात लवकर बरं होऊन सिमल्याला जाणं श्रेयस्कर. तिथं गेल्यावर शुम्मीशी तू जुळवून घेतलं पाहिजेस. आपले जे मतभेद वा राग-लोभ आहेत, ते तुझी प्रकृती उत्तम झाली की मग आपण सोडवू. तू पुन्हा तजेलदार दिसली पाहिजेस. तब्येत ठीक होईस्तोवर मला रोज पत्र नि तारेने तुझी ख्याली-खुशाली कळवत जा. पूर्ण बरं झाल्याखेरीज काहीही नवे काम अंगावर घ्यायचे नाहीय. माझी तार तुला मिळाली असेलच.

तुझा, जुलमी बापू



अमृता कौर, सी. राजगोपालाचारी, जवाहरलाल नेहरु आणि आँग सॅन

हिमतीने भिडत होते, संघर्ष करीत होते; तेव्हाही आपल्या माणसांना पत्र लिहायला वेळ काढत होते. आज तेच लेखन जगाला मार्गदर्शक ठरत आहे. हजारोंची घरं पेटली होती, हिंदू-मुस्लिम तेढ वाढलेली होती, हत्या होत होत्या... तसल्या भीषण अवस्थेतही त्यांचा नैतिकतेवर, 'सत्य'नामक देवावर अढळ विश्वास होता.

त्यांनी अमृतकौरना लिहिलेली पत्रं एक अमूल्य ठेवा आहे. ज्यात गांधी, कौर, तेव्हाचा समाज, राजकारण, समाजकारण, नैतिक प्रश्न, वैयक्तिक नाजूक बाबींतही खुलेपणा, परस्पर अतीव प्रेम आपल्याला वाचायला मिळते. तो काळ कळतो नि आपण थक्क होतो. राजकुमारी अमृताकौर यांचे व्यवस्थापनकौशल्य आणि स्वातंत्र्यलढ्यात केलेलं काम यामुळे त्या जवाहरलाल नेहरूंच्या पहिल्या मंत्रिमंडळातील एकमेव महिला केंद्रीय मंत्री बनल्या होत्या. त्यांच्याकडे आरोग्य खाते होते. त्यांनी ते दहा वर्षे यशस्वीपणे सांभाळले होते. ऑल इंडिया मेडिकल इन्स्टिट्यूट स्थापन करून त्याचे नेतृत्व केले. जगातील अनेक संस्थांकडून त्यासाठी मदत मिळवली. रेडक्रॉसच्या त्या अध्यक्ष होत्या. त्या काळात क्षयासारख्या रोगाच्या उपचारासाठी त्यांनी अविश्रांत काम केले. गरीब, गरजवंत यांकडे अधिक ममतेने लक्ष पुरवले. वर्ल्ड हेल्थ ऑर्गनायझेशनच्या त्या पहिल्या महिला अध्यक्ष झाल्या. राज्यसभेच्या सदस्य म्हणूनही त्यांची कारकीर्द गाजली. त्यांनी वारशाने मिळालेला मनोर हा विशाल व्हिला समाजाला अर्पण केला. तिथे नर्सेसच्या राहण्याची, प्रशिक्षणाची व्यवस्था केली.

त्यांच्यातील आणि गांधीजींमधील पत्रव्यवहार अनेक अर्थांने महत्त्वपूर्ण आहे. ते तिलाच नव्हे, खरं तर प्रत्येकीला काही ना काही वैशिष्ट्यपूर्ण नावाने संबोधत असत. स्वत: राजकुमारीला ते अमृत, रिबेल, इडियट, सिस्टर म्हणून संबोधत; स्वत: कधी बापू, तर कधी एम.के.गांधी, तर कधी टायरंट अशी सही करीत. पण इडियट आणि रिबेल ही त्या दोघांचीही खास आवडीची संबोधनं असत. त्यातून अगदी स्पष्टपणे एकमेकांची चेष्टा, खोड्या किंवा अगदी खासगी बाबीही लिहिल्या जात. स्वत: मात्र टायरंट- छळवादी, जुलमी म्हणवून घेत. त्यातून त्यांचे नाते, विचारांची गहराई, मानवतेबद्दल अतूट प्रेम, सामाजिक प्रथा, धर्म यांचे राजकारण या साऱ्यांची चर्चा या प्रेमपत्रात गांधींचेच शब्द ओतप्रोत भरलेली वाचकाला जाणवेल.

**संजीवनी खेर**, मुंबई ४०००१४.
Ph : 022-24141669, 9821411472

**भाषा : स्त्रियांची / स्त्रियांविषयीची**



अपर्णा दीक्षित

# तूच कर्ता आणि करविता

अमेरिकेत जी गोष्ट कृष्णवर्णीय लोकांची आहे– ती आपल्या इथे दलित–बहुजन जातींतल्या व्यक्तींची आहे, आपल्या हक्कांसाठी लढा देणाऱ्या आदिवासींची आहे, समाजात सामावून न घेतल्या जाणाऱ्या तृतीयपंथीयांची आहे आणि तीच गत स्त्रियांची आहे. अशा अविश्वासातून जेव्हा समाज, कुटुंबातल्या इतर व्यक्ती, न्यायव्यवस्था व्यक्तीकडे पाहते, त्यातून त्या व्यक्तीचे दोन प्रकारचे नुकसान होते. व्यक्तीला दिलासा, न्याय कधी उशिराने मिळतो तर कधी मिळतच नाही, हा पहिला भाग. शिवाय व्यक्तीला जर सतत सर्व पातळ्यांवर संशय– अविश्वास यांचा सामना करावा लागत असेल, तर बरोबर आणि चूक ठरवण्याची व्यक्तीची जी क्षमता असते, त्याची हानी होऊ शकते. यातून व्यक्तीच्या स्व–ला सहज भरून न निघणारी इजा होत असते. कुणी जर सतत असं सांगत असेल की– बघ हं, सांभाळून राहा, असे कपडे घालू नकोस, फार मोठ्यांदा हसू नकोस, शक्यतो पडती बाजू घे... तर काय करणे बरोबर आहे आणि काय नाही, हे ठरवण्यासाठीचा जो आत्मविश्वास व्यक्तीकडे हवा, तो कसा शाबूत राहील?

जर अमेरिकेतील वंशभेदाबद्दल किंवा भारतातील जातिभेदाबद्दल चर्चा होणार असेल, तर कोण व्यक्ती डोळ्यांसमोर येतात? वंशभेद हा कृष्णवर्णीयांचा, अमेरिकी लॅटिनांचा प्रश्न आहे, तर जातिभेद हा दलित–बहुजन जातींचा प्रश्न आहे, असं वाटणं स्वाभाविक आहे. त्याचप्रमाणे लिंगभेदाचा प्रश्न हा स्त्रियांचा आहे; तर लैंगिकतेच्या प्राधान्याचे प्रश्न हे लेस्बियन, गे, बायसेक्शुअल, तृतीयपंथी व्यक्तींचे आहेत– अशी समीकरणे सर्वांना सहज मान्य होतील अशी आहेत. या प्रकारच्या भाषिक समीकरणात काही मुळातून गल्लत आहे. श्वेतवर्णीय व्यक्तींना वांशिक ओळख नसते का? मराठा–ब्राह्मणांना जात नसते का? तसंच पुरुष असणे ही gender identity आहे, शिवाय विरुद्ध लिंगी व्यक्तीबद्दल आकर्षण वाटणे (heterosexual) हेही एक प्रकारचे प्राधान्यच आहे. जिथे 'शोषितांचे प्रश्न' अशी व्याख्या केली जाते, तिथे शोषण करणारे नजरेतून– चर्चाविश्वातून आपसूक बाहेर होतात. म्हणूनच स्त्रियांचे प्रश्न असं म्हटलं की, 'हे काय आपल्यासाठीचं नाही' असं म्हणून पुरुषांनी चर्चेत सहभागही नोंदवण्याची गरज उरत नाही. किंबहुना, वर दिलेल्या उदाहरणांमध्ये समाजात वर्चस्व असणाऱ्या कोणत्याच गटाकडे बारकाईने तपासणीच्या दृष्टिकोनातून पाहिलं जात नाही. या प्रकारचं दुर्लक्ष शेकडो वर्षं चालत आलेलं आहे. यातून वर्चस्व असणारे गट टिकून राहतात आणि पुन:पुन्हा तशाच प्रकारची सामाजिक बांधणी उभी राहते. वर्चस्व असणाऱ्या गटातील व्यक्तींना त्यांच्याकडे असलेल्या वर्चस्वाचा खोलात जाऊन विचार करण्याची संधी आपला समाज सहज उपलब्ध करून देत नाही. कुटुंबातील इतर पुरुषांना आपले बोलणे किंवा वागणे रुचते आहे का याची जितकी चिंता कुटुंबातल्या स्त्रियांना करावी लागते, तितका विचार पुरुषांना आपल्या वागण्या–बोलण्याबद्दल करावा लागत नाही, हे आपल्या आजूबाजूला अनेकदा दिसते. अशा वर्चस्वाला बहुतेकदा कोणताही शह बसत नाही. सत्ता (power) आणि मक्तेदारी (privilege) यातले संबंध घट्ट असतात. शिवाय ज्या व्यक्तींकडे किंवा व्यक्तींच्या समूहाकडे सत्ता आणि

मक्तेदारी/विशेषाधिकार दोन्ही असतात, तेव्हा असे बेलगाम वर्चस्व असणाऱ्या गटाला/व्यक्तींना स्वपरीक्षण करण्याचीही गरज उरत नाही. वर्चस्व असणाऱ्या गटातल्या व्यक्तींच्या निवडींची, निर्णयांची फारशी छाननी होत नाही. एक प्रकारे या गटातील व्यक्ती निर्धोकपणे, बिनधास्त असे जीवन जगत असतात. कित्येक वेळा वर्चस्व असणाऱ्या व्यक्तींना समाजाकडून इतक्या विविध प्रकारची मुभा मिळत असते की, या व्यक्ती अदृश्य, कोणाच्याही परीक्षणाच्या कक्षेत नसलेलं असं आयुष्य सहज जगत असतात. शिवाय 'सामाजिक प्रश्नांच्या चर्चाविश्वात'ही या व्यक्तींचा कुठे ठाम उल्लेख नसतो. उदाहरणार्थ- कौटुंबिक हिंसा, बलात्कार यांसारख्या मुद्यांना धरून चर्चा करण्याची किंवा कृतिकार्यक्रम आखण्याची जेव्हा वेळ येते, तेव्हा काय होतं? जे खरं तर मोठ्या प्रमाणात 'पुरुषांचे प्रश्न' आहेत, त्यांचा सतत उल्लेख 'स्त्रियांचे प्रश्न' असा केल्यामुळे पुरुषांची या सगळ्यात काय भूमिका असावी यावर खूपच कमी भर दिला जातो. पुरुषांचे वागणे, त्यांच्यावर समाजाकडून केले जाणारे संस्कार, जडण-घडणीच्या वयातल्या मुलग्यांचे शारीरिक आणि मानसिक प्रश्न याकडे लक्ष तर दिले जात नाहीच; आणिक भर म्हणून पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेल्या त्यांच्यासाठीच्या वागण्याच्या पद्धती जशाच्या तशा स्वीकारल्या जातात.

या सगळ्याकडे भाषिक अंगाने कसं पाहता येईल हे बघू. पुरुषांकडून केले जाणारे लैंगिक अत्याचार, खून यांच्या बातम्यांचे काही नमुना मथळे खाली दिले आहेत-

१. महिलेची निर्घृण हत्या

२. नऊ वर्षीय बालकावर लैंगिक अत्याचार

३. ॲसिड टाकण्याची धमकी देऊन शाळकरी मुलीवर लैंगिक अत्याचार

या तीनही बातम्यांमध्ये संशयित आरोपी कोण आहे, हे माहिती आहे. किंबहुना, दोन घटनांमध्ये व्यक्तीची कबुली आहे आणि अटकही झालेली आहे, असं बातमी पूर्ण वाचल्यावर कळतं. मात्र बातमीच्या मथळ्यांमध्ये 'गुन्हे करणारी व्यक्ती' अजिबात दिसत नाही. वाक्यातील कर्ता गाळून टाकला आहे, असं दिसतं. असे मथळे कर्मणी प्रयोगात (passive voice) मध्ये लिहिले जातात किंवा कर्ता गाळून कर्तरी प्रयोगात (active voicewithout subject) लिहिले जातात. वाक्यरचनेत असे ठरावीक बदल पुन: पुन्हा दिसून येतात आणि यातून वाचकाचे लक्षही ठरावीक तपशिलांकडे वेधले जाते. आता वरील मथळे पाहिल्यास असे लगेच लक्षात येते की- हत्या झालेली महिला, नऊ वर्षांचे बालक (म्हणजे मुलगा, कारण जर ती मुलगी असती तर मीडिया ते विशेषकरून नक्की छापतोच.) आणि शाळकरी मुलगी ही जणू बातमीतील मुख्य माहिती आहे. यातून काय कल मनात तयार होतात?- *बायकांच्या सुरक्षिततेचं आजकाल काही खरं नाही, आता लहान मुलग्यांबाबतही असले प्रकार घडू लागले आहेत, शाळा वगैरेंसाठी पण मुलींना घराबाहेर सोडावं तर असे प्रकार घडतात..* हेच मथळे जर गुन्हेगार कोण आहे हे डोळ्यांसमोर ठेवून लिहिले, तर आपल्याला त्याबद्दल विचार करणे गरजेचे होईल. '२३ वर्षीय सुशिक्षित, बेरोजगार तरुणाची लैंगिक अत्याचाराच्या गुन्ह्यात दोषी असल्याची कबुली' असा मथळा छापला तर असे गुन्हे कोण करत आहे, त्या व्यक्तीची परिस्थिती काय आहे, त्या व्यक्तीच्या आर्थिक-सामाजिक पार्श्वभूमीचे विश्लेषण या बाबींचा विचार आपसूक करावा लागेल. अशा प्रकारे passive voice मध्ये किंवा पीडित व्यक्तीला केंद्रस्थानी ठेवून जे वार्तांकन किंवा वर्णन केलं जातं, त्याला prescribed passivity असं म्हटलं जातं. या बातम्या जेव्हा छापून येतात, तेव्हा अनेकदा पीडित स्त्रीच्या किंवा व्यक्तीच्या परिस्थितीचे वर्णन सनसनाटी वाटेल, अशा प्रकारे केले जाते. गुन्हा करणाऱ्या व्यक्तीचा मात्र एखाद-दोन ओळींत उल्लेख असतो. वरील बातम्यांचे मथळे ज्या व्यक्तींबद्दल आहेत, त्यांना आणि त्यांच्या कुटुंबीयांना किती तरी मनस्ताप या सनसनाटीकरणामुळे होत असतो. इथे हा त्रास गुन्हा करणाऱ्याला व्हावा, हा मुद्दा अजिबात नाही. असा त्रास मुळातूनच शोषण झालेल्या व्यक्तीला निश्चितच होऊ नये. लिंगभेदातून होणारी जी हिंसा आहे (gender violence) तिचं वर्णन जेव्हा कायद्याच्या कक्षेतही केलं जातं, तेव्हा शोषित व्यक्ती केंद्रस्थानी असते. याचं इंग्रजीतलं एक उदाहरण पाहू या.

- Jack beat Martha. (जॅकने मार्थाला मारले- घटना)

- Martha was beaten by Jack. (मार्थाला जॅकने मारले.- इथे आपले लक्ष मार्थाला मारले गेले, याकडे काही प्रमाणात वळते.)

- Martha was beaten. (मार्थाला मारले गेले. - या वाक्यात जॅक नाहीये.)

- Martha was battered. (मार्थाला मारहाण केली गेली. -जॅक कधीच चर्चेतून बाहेर आहे आणि मार्थावर

झालेल्या हिंसेचे अधिक चित्रमय वर्णन पाहायला मिळते.)

- Martha is a battered woman. (मार्था मारहाण झालेली स्त्री आहे.- अशा वर्णनांमधून मार्थाची ओळखच जणू तिच्यावर झालेल्या हिंसेच्या घटनेतून ठरवली जाते आहे आणि वाक्याला कर्ता नसल्याने त्या व्यक्तीचा साधा उल्लेखही केला जात नाही.)

आता यामध्ये जॅकने चर्चेतून अंग कधीच काढून घेतले आहे आणि सगळं लक्ष मार्थावर आहे. स्त्रियांविरुद्धच्या अत्याचाराच्या बातम्या जेव्हा वेगानं पसरतात आणि चर्चिल्या जातात, तेव्हा शोषित व्यक्तीच्या वागण्याचीच जास्त मीमांसा होते. उदाहरणार्थ- तिने कपडे कसे घातले होते, संध्याकाळी फार उशीर झाला होता का, ती एकटी बाहेरच कशाला गेली- अशा गोष्टींवर भरपूर ऊहापोह होतो. याला victim blaming असं म्हणतात. आणि असा ठपका इतर वेळेस ठेवलेला दिसत नाही. एखाद्या पुरुषाचा खून झाला तर तो एकटा का होता, असा प्रश्न विचारला जात नाही. शिवाय शोषित/पीडित स्त्रीचं जे वर्णन केलं जातं- जसं की, शाळकरी मुलगी असणे- यातून काय साध्य होतं? शाळेत जाणाऱ्या मुलींचे पालक जेव्हा हे वाचतात, तेव्हा ते आपल्या मुलींवर आणखी जास्त बंधनं घालायला जातात. तर शाळेत जाणाऱ्या मुलग्यांच्या पालकांनी आपल्या मुलाला काय सांगायचे आहे, काय समजवायचे आहे याची चर्चा व्हायला वावच उरत नाही. आता गुन्हेगाराचा उल्लेख अजिबातच नसतो किंवा त्याबद्दलचे तपशील नसतातच, असं नाही. विशेषत: पतीने केलेल्या गुन्ह्यांची नोंद ही कायम पतीचा उल्लेख करून केलेली दिसते, मात्र इतर सर्व वेळा शोषित व्यक्ती केंद्रस्थानी आहे असं दिसतं.

जगभरातून अशा प्रकारे भाषेत बदल केले जावेत, गुन्हा करणाऱ्या पुरुषांचा ठळकपणे उल्लेख करावा- असा आग्रह जेव्हा धरला जातो, तेव्हा सगळीकडून प्रचंड टीकेची झोड उठते आणि 'सगळे पुरुष असे नसतात' (not all men) असे सांगितले जाते. Not all men चा धोशा लावून धरल्याने, गुन्हे होऊच नयेत यासाठी प्रतिबंधात्मक उपाय काय करता येतील याकडे सातत्याने दुर्लक्ष होते. यातून छोटे मुलगे, पौगंडावस्थेतील तरुण यांच्याशी वेगवेगळ्या प्रकारे संवाद साधायची वेळ हातातून निघून जाते आणि अधिकाधिक व्यक्ती शोषणाला बळी पडतच राहतात. खरं तर हा मुद्दा केवळ स्त्रियांपुरताच सीमित नाही. लहान मुला-मुलींचे होणारे शोषण, तृतीयपंथी व्यक्तींना सहन करावी लागणारी शारीरिक-मानसिक हिंसा आणि स्त्रियांविरुद्ध घडणारे गुन्हे या सगळ्यामध्ये पुरुषांचे प्रमाण लक्षणीय आहे. भारतात पती आणि सासरच्या इतरांकडून होणाऱ्या छळाखालोखालचे प्रमाण हे विनयभंगाच्या गुन्ह्यांचे आहे, तर त्याखालोखाल बलात्कार आणि अपहरण यांचे आहे. (संदर्भ- Women and Men in India -- statistical compilation of Gender related Indicators in India, 2018 तसेच Crime in India 2016, National Crime Records Bureau, Ministry of Home Affairs.) यात एक गंभीर मुद्दा असा की, हे सर्व विश्लेषण Crimes Committed Against Women याचा भाग म्हणून दिलेले असते; मात्र Crimes committed by men किंवा Crimes committed by women अशी आकडेवारी कुठेही ठळकपणे दिसत नाही. दर तीन मिनिटाला एका स्त्रीला अत्याचाराचा सामना करावा लागतो, असे मथळे दिसत राहतात. दर तीन मिनिटाला पुरुषांकडून अत्याचार केला जातो, असा मथळा का दिसत नाही? Not all men या युक्तिवादावर अवलंबून राहणे धोक्याचे आहे. हे वारंवार दाखवून दिले जाते की- विनयभंग, बलात्कार यामध्ये कुटुंबातील व्यक्ती दोषी असण्याचे प्रमाण खूप मोठे आहे. Not all men च्या हट्टापायी चुकीचे वर्तन करणारा पुरुष हा कुणी नराधम-खुनशी नसून तो कुणीही, सर्वसामान्य असू शकतो, हे चित्र बऱ्याचदा नीट उभं राहत नाही. शिवाय सर्वच मुलग्यांना-पुरुषांना या विषयाबाबतीत संवेदनशील, जागरूक बनवण्याची संधीही उरत नाही. मी स्वत: त्यातला नाही, माझ्या कुटुंबातले पुरुष असे नसणारच- असं वाटून अनेकदा मनाचं समाधान करून घेतलं जातं किंवा याकडे संपूर्ण दुर्लक्ष केलं जातं. आपल्या पाठ्यपुस्तकांमध्ये स्त्रियांविरुद्ध होणारे गुन्हे किंवा पुरुषांकडून केले जाणारे अत्याचार या विषयाबद्दल शाळेपासून ते पदवीच्या शिक्षणापर्यंत संपूर्ण मौन आहे. कायदा किंवा समाजशास्त्र शिकणाऱ्या मोजक्या लोकांना या विषयाची तोंडओळख होते, मात्र इतर सगळीकडे आनंद आहे.

यासंबंधी एक बाब लक्षात घेणे आवश्यक आहे की, हा स्त्री विरुद्ध पुरुष असा मुद्दा नाहीये. भाषा वापरताना केल्या जाणाऱ्या निवडी या स्त्री-पुरुष दोघांच्या विकासाला खीळ घालणाऱ्या असतात, असा हा मुद्दा आहे. वरील सगळी आकडेवारी, चर्चा ही पोलीस/न्यायव्यवस्था या सगळ्यापर्यंत पोहोचलेल्यांची आहे. पोलिसांची किंवा

कायदेशीर मदत सगळ्या पीडितांना उपलब्ध असतेच असे नाही. शिवाय हे खूपदा दिसून येतं की, ज्या गटाचे शोषण होते आहे त्याची या सगळ्या प्रक्रियेत वारंवार मानहानी होते. शिवाय पीडित स्त्रीची या सगळ्यात कबुली (consent) तर नव्हती, अशी शंकाही व्यक्त केली जाते. विशेषत: बलात्काराच्या प्रकरणांबाबतीत हे जास्त खरे आहे. इथे एका मुद्याचा विचार व्हायला हवा. जर एखादा पुरुष कोणतीही तक्रार करत असेल, पाकीट मारल्याची किंवा अगदी शारीरिक बळजबरी झाल्याचीसुद्धा जरी बाब असेल तरी त्याच्यावर ताबडतोब विश्वास ठेवण्याकडे कल असतो. मात्र तक्रार करणारी व्यक्ती स्त्री असेल, तर तिच्यावर पुराव्याशिवाय सहज विश्वास ठेवला जात नाही किंवा खूप चौकशी, उलटसुलट प्रश्न यानंतरच तिच्यावर विश्वास ठेवला जातो. घरगुती भांडणांमध्येसुद्धा जर तक्रार करणाऱ्या स्त्रीची बाजू कुटुंबातल्या एखाद्या पुरुषाने घेतली, तर तिचं म्हणणं तुलनेने सहज ऐकून घेतलं जातं, विश्वास ठेवला जातो. अन्यथा ती स्त्री भांडकुदळ, कांगावखोर ठरवली जाते. अशा वर्तणुकीला second guessing- अविश्वासाची भूमिका असं म्हणतात. पुन्हा एकदा हे केवळ स्त्रियांबरोबर नाही तर सर्व शोषित गटांबरोबर केले जाते. जॉर्ज फ्लॉइडच्या दुर्दैवी मृत्यूनंतर अमेरिकेत कृष्णवर्णीय लोकांच्या हक्कांसाठी जी खूप मोठ्या प्रमाणात आंदोलने चालली आहेत, त्यामध्येसुद्धा हा मुद्दा वारंवार पुढे आणलाय. 'मला श्वास घेता येत नाहीये' हे तो मृत्यूच्या आधी सतत म्हणत होता त्याकडे त्याचा प्राण घेणाऱ्या ऑफिसरने ज्या सहजतेने दुर्लक्ष केले, त्या विरुद्धचा हा राग आहे. 'मला श्वास घेता येत नाहीये' अशीच विनवणी जर एखाद्या संशयित श्वेतवर्णीय व्यक्तीने केली असती तर परिणाम निश्चित वेगळा असता, हे आपल्याला माहिती आहे. अमेरिकेत जी गोष्ट कृष्णवर्णीय लोकांची आहे- ती आपल्या इथे दलित-बहुजन जातींतल्या व्यक्तींची आहे, आपल्या हक्कांसाठी लढा देणाऱ्या आदिवासींची आहे, समाजात सामावून न घेतल्या जाणाऱ्या तृतीयपंथीयांची आहे आणि तीच गत स्त्रियांची आहे. अशा अविश्वासातून जेव्हा समाज, कुटुंबातल्या इतर व्यक्ती, न्यायव्यवस्था एखाद्या व्यक्तीकडे पाहते, त्यातून त्या व्यक्तीचे दोन प्रकारचे नुकसान होते. व्यक्तीला दिलासा, न्याय कधी उशिराने मिळतो तर कधी मिळतच नाही, हा पहिला भाग. शिवाय व्यक्तीला जर सतत सर्व पातळ्यांवर संशय- अविश्वास यांचा सामना करावा लागत असेल, तर बरोबर आणि चूक ठरवण्याची व्यक्तीची जी क्षमता असते, त्याची हानी होऊ शकते. यातून व्यक्तीच्या स्व-ला सहज भरून न निघणारी इजा होत असते. कुणी जर सतत असं सांगत असेल की- बघ हं, सांभाळून राहा, असे कपडे घालू नकोस, फार मोठ्यांदा हसू नकोस, शक्यतो पडती बाजू घे... तर काय करणे बरोबर आहे आणि काय नाही, हे ठरवण्यासाठीचा जो आत्मविश्वास व्यक्तीकडे हवा, तो कसा शाबूत राहील? या सगळ्या दिव्यांमधून पार पडल्यावर जर दुर्दैवाने काही अपप्रसंग घडला तरी पुन्हा तुमच्याच वर्तनाची कसून शहानिशा होणार! असं कसं चालेल?

म्हणूनच या सगळ्याकडे आधी म्हटल्याप्रमाणे, स्त्री विरुद्ध पुरुष असा मुद्दा न पाहता घटनेत सहभागी विरुद्ध बघ्याची भूमिका वठवणारे, असंही पाहिलं पाहिजे. अनेकदा जेव्हा मुलगे चुकीचं वागत असतात तेव्हा आजूबाजूचे, कुटुंबातले स्त्री आणि पुरुष दोघेही वेगवेगळ्या प्रकारे शांत राहतात. Boys will be boys हे बदलायला हवं. त्यातही वर म्हटल्याप्रमाणे पुरुषांच्या म्हणण्याला जास्त आणि सहज मान्यता मिळते. तेव्हा आपल्या आजूबाजूला जर स्त्रियांप्रति हीन वागणुकीची चर्चा सहज होत असेल, स्त्रियांच्या शरीरावरून केले जाणारे विनोद नॉर्मल वाटत असतील किंवा कौटुंबिक हिंसेकडे 'ज्याचा-त्याचा मामला' म्हणून दुर्लक्ष करण्याचे धडे आपल्याला मिळत असतील, तर तेही बदलायला हवं. स्वत:च्या कुटुंबीयांच्या, मित्रांच्या विरोधात बोलणे ही अनेकदा सोपी गोष्ट नसते हे खरं आहे. मात्र या रोजच्या आयुष्यातल्या भाषेतल्या आणि वृत्तीतल्या बदलांशिवाय मोठे बदल घडून येणार नाहीत. लिंगभेदातून होणारे अत्याचार, गुन्हे रोखण्यासाठी प्रश्न मुळातून समजून घेण्याकडे भाषेने आपला रोख वळवला पाहिजे. यातून पुरुषांच्या जडण-घडणीच्या काळात शिक्षणात काय बदल अत्यावश्यक आहेत, कुटुंबात काय बदल करायला हवेत याकडे तर लक्ष वेधलं जाईलच; त्याचबरोबर victim blaming च्या भाषेवरही बंधनं येतील. स्त्रियांच्या हक्काचे प्रश्न मानवी हक्कांचे आहेत. चुकीचे वर्तन कुणाबरोबर घडते आहे याकडे तर लक्ष दिलेच पाहिजे. मात्र त्या वर्तनामागचा 'कर्ता' कोण आहे, अशा वर्तनामागची 'करविता' शक्ती कोणती आहे, हेही आता डोळसपणे पाहायला हवे.

**अपर्णा दीक्षित**, पुणे
aparna.a.dixit@gmail.com

डॉक्युमेंटरी

नीलांबरी जोशी



# थांबता ना थांबती वादळे ही रक्तातली!
# समरहिल शाळा

सगळ्या शाळांनी नाकारलेली एक ८ वर्षांची मुलगी... अखेरीस एका वेगळ्या प्रकारच्या शाळेत अत्यंत नाइलाजानं तिचे श्रीमंत आई-वडील आपल्या भल्या मोठ्या गाडीतून तिला घेऊन येतात. मुलगी गाडीतून खाली उतरते, तेव्हा 'इथे तरी नीट अभ्यास कर, असं आई बजावून सांगते. वडील मात्र त्या मुलीला तू आनंदात राहा' असा सल्ला देतात. मुलीच्या हातात एक मोबाईल देऊन आई-वडील निघून जातात.

भोवताली विविध वयांची मुलं हसत-खेळत, दंगा करत, थट्टा-मस्करी करत शाळेबाहेरच्या हिरवळीवर बागडत असतात. काही जण झाडांवर चढत असतात. एक मुलगी परीचा वेष घालून शाळेशेजारच्या गर्द झाडी असलेल्या वाटेनं निघालेली असते. काही जणांनी तर चक्क शाळेच्या हिरवळीवर ऑर्केस्ट्रा उभा केलेला असतो. त्याच्या तालावर काही जण मस्त नाचत असतात. काही जण स्विमिंग पूलमध्ये पोहत असतात. काही जिमवर मस्ती करत असतात. घट्ट वेणी घातलेली, चेहऱ्यावर हट्टी भाव असलेली ती मुलगी मात्र काय करावं हे न कळल्यानं काही क्षण नुसतीच उभी राहाते.

मग ती 'मुख्याध्यापक कुठे आहेत?' असं विचारत शाळेचा दरवाजा उघडून आत जाते. तिच्या हातात तिला कोणते विषय शिकायला आवडतील, हे भरायचा एक फॉर्म शिक्षक देतात. नेहमीच्या विषयांबरोबरच नाटक, कथाकथन, कलाकुसर अशा अनेक गमतीजमती असलेले विषय त्यात असतात. ती मुलगी आता मात्र भांबावूनच जाते. तिला आत्तापर्यंत कोणीच तुला काय शिकायचंय वगैरे फालतू(!) प्रश्न विचारलेले नसतात. मग सवयीनं ती मुलगी त्या फॉर्मवर गणित, विज्ञान वगैरे विषयांशेजारी टिकमार्क करते. शिक्षकांना तो फॉर्म दिल्यावर ते विचारतात, ''नक्की? तुला हेच शिकायचंय?''

हे सगळं एखाद्या काल्पनिक कथेवर आधारित असलेल्या फिल्ममध्ये घडत असेल, असं आपल्याला वाटेल. पण इंग्लंडमधल्या सफोक परगण्यात अशी शाळा गेली ९९ वर्षं अस्तित्वात आहे. तिचं नाव आहे समरहिल. समरहिल ही त्याच्या संस्थापकाच्या नावानं म्हणजे 'नीलची

समरहिलचं सर्वांत महत्त्वाचं वैशिष्ट्य म्हणजे तिथल्या मीटिंग्ज. संपूर्णपणे लोकशाही तत्त्वावर चालणाऱ्या या शाळेत सगळे नियम आणि निर्णय दर आठवड्याला होणाऱ्या मीटिंगमध्ये घेतले जातात. या मीटींग्जमध्ये सगळी मुलं आणि स्टाफ एकत्र असतो. पाच वर्षांचा मुलगादेखील आपलं मत या मीटिंगमध्ये मांडतो. समरहिल फिल्ममध्ये रायन या विद्यार्थ्यानं पैसे चोरले आणि एका मुलाबरोबर मारामारी केली, असे त्याच्यावर आरोप होतात. तेव्हा सगळी मुलं एक मीटिंग घेतात. त्यात खुले आम चर्चा होऊन शिक्षा द्यायची का नाही आणि काय द्यायची, हे ठरवलं जातं. सर्वांना न्याय आणि आपलं मत मांडायला परवानगी देणाऱ्या अशा मीटिंग्ज कॉर्पोरेट जगातही कधी होताना दिसत नाहीत.

शाळा' म्हणून जगभरात प्रसिद्ध आहे. आता पृथ्वीवर समरहिल ही सर्वांत प्रागतिक शाळा आहे. कोणत्याही मुलाच्या/मुलीच्या इच्छेविरुद्ध तिला/त्याला वर्गात शिकण्याची सक्ती करायची नाही, हा या शाळेचा सर्वांत महत्त्वाचा नियम आहे.

२००८ मध्ये बीबीसी आणि इतर काही संस्थांनी मिळून समरहिलवर एक फिल्म तयार केली. या फिल्मच्या सुरुवातीला वरती उल्लेख केलेली मुलगी म्हणजे मॅडी आणि सगळ्या शाळांनी घालवून दिलेला १२ वर्षांचा रायन हे दोघं प्रवेश करतात. समरहिलच्या एका सत्रात मॅडी आणि रायनमध्ये कसं परिवर्तन घडत जातं, ते या फिल्ममध्ये आपल्यासमोर उलगडत जातं.

समरहिल याच नावाची ही फिल्म जॉन ईस्ट या दिग्दर्शकानं प्रस्थापित शिक्षणव्यवस्थेला किती उत्कृष्ट पर्याय असू शकतो, हे जगासमोर आणण्यासाठी तयार केली आहे. त्यासाठी जॉननं समरहिल शाळेतल्याच ११ वर्षांच्या काही मुलांच्या हातात कॅमेरा दिला. ती मुलं कॅमेरा वापरायला शिकली. समरहिलमध्ये त्यांनी रोजचं चित्रीकरण करायला सुरुवात केली. या फिल्ममध्ये समरहिल शाळेचा परिसर, तिथली मुलं, शिक्षक, भोवतालचं खेळीमेळीचं वातावरण, निर्णयांसाठी घेतलेल्या मीटिंग यांचं अत्यंत नेमकं आणि नेटकं चित्रण केलं आहे. बाफ्तापासून ॲस्ट्रा फिल्म फेस्टिव्हल- रोमानिया, जर्सी शोअर फिल्म फेस्टिव्हल, सांता फे फिल्म फेस्टिव्हल अशा अनेक ठिकाणचे मानसन्मान या फिल्मनं पटकावले आहेत.

पण या फिल्मचा उद्देश केवळ मॅडी आणि रायनची गोष्ट सांगणं हा नाही. ऑफिस फॉर स्टँडर्ड्स इन एज्युकेशन- ऑफस्टेड या इंग्लंडमधल्या शिक्षणक्षेत्राचे नियम ठरवणाऱ्या सरकारी संस्थेनं समरहिलमध्ये येऊन १९९९ मध्ये शाळेची तपासणी केली. त्यावरून ही शाळा मुलांसाठी योग्य नसल्याचा शेरा मारून बंद करावी, असा अहवाल सरकारकडे सादर केला. व्यक्तिगत स्वातंत्र्याचा अर्थ स्वैराचार असा लावून तिथे धुडगूस चालतो, असा आरोप केला. या अहवालानंतर शाळेच्या मुलांनी एकत्र येऊन या अहवालाविरोधात कोर्टात याचिका दाखल केली. ही मुलं आपली शाळा चालू राहावी यासाठी स्वत: कोर्टात गेली. या नाट्यमय खटल्याची कथा हा समरहिल या फिल्मचा गाभा आहे.

या फिल्ममध्ये मॅडी आणि रायन या दोन मुलांबरोबर ११ ते १६ वयोगटातली सगळीच मुलं आयुष्यातले महत्त्वाचे निर्णय घेताना दिसतात. शाळेच्या राजकीय आणि कायदेशीर लढाईत ते सक्रियपणे उतरताना दिसतात. काम करताना, खेळताना, जबाबदारी घेताना वाढणारी ही मुलं पाहणं हा आनंदाचा भाग आहे. शिक्षण, राजकारण, सरकारी नियम, स्वातंत्र्य, मुलांची मानसिक वाढ, त्यांच्यात हिंसा का निर्माण होते, मुलं कशी शिकतात- अशा अनेक गोष्टींबद्दलची आपली मतं समरहिल ही फिल्म पूर्णपणे बदलवून टाकते. मुळात आत्ताच्या युद्धखोर जगातली सगळी युद्धं, माणसा-माणसांमधला सगळा द्वेष, सगळे गुन्हे घडण्यामागचं कारण माणूस आनंदी नसणं हे आहे, असं समरहिलचा संस्थापक ए.एस.नील याचं म्हणणं होतं.

नीलनं समरहिल स्कूल १९२१ मध्ये स्थापन केलं, तेव्हा समाजात व्यक्तिस्वातंत्र्याला आजच्याइतकं महत्त्व नव्हतं. बऱ्याच घरांमध्ये मुलांना छडीचा बडगा दाखवला जायचा. कठोर शिस्त हाच मुलांचा वाढवायचा एकमेव मार्ग मानला जायचा. यामुळे मुलांचं स्वत:वर फक्त स्वत:चं नियंत्रण असावं, 'सेल्फ गव्हर्न्मेंट आणि त्यांना संपूर्ण स्वातंत्र्य'- फ्रीडम मिळावं, या दोन गोष्टींचा पुरस्कार करायला समरहिल शाळेला बरंच झगडावं लागलं.

''शाळा सुरू झाल्यानंतर अनेक वर्षांनी समरहिलमध्ये सेल्फ गव्हर्न्मेंटचा उपयोग होतो, हे आम्ही सिद्ध केलंय. खरं तर कोणत्याच शाळेमध्ये सेल्फ गव्हर्मेंट नसेल तर तिला प्रगतिशील शाळा म्हणताच येणार नाही. आपलं सामाजिक आयुष्य आपल्या हातात आहे, असं एखाद्या शाळेत जोपर्यंत मुलांना वाटत नाही; तोपर्यंत ती शाळा स्वतंत्र विचारांचा पुरस्कार करते असं म्हणता येणार नाही,'' असं नील सेल्फ गव्हर्न्मेंटबद्दल म्हणाला होता. तसंच स्वातंत्र्याबाबत विचार मांडताना, मुलांच्या नैसर्गिक आवडी-निवडी जर समाजाला मान्य असणाऱ्या आवडींपेक्षा वेगळ्या असतील, तर मुलांना त्यांना हवं असेल ते करू द्यावं, याबाबत नील आग्रही होता.

मुलांना हवं ते करू देणाऱ्या समरहिल शाळेच्या ९९ वर्षांच्या आयुष्यात १००० विद्यार्थी शिकले आहेत. त्यापैकी काही जणांच्या कहाण्या खूप बोलक्या आहेत. उदाहरणार्थ- टॉम हा मुलगा त्याच्या वयाच्या पाचव्या वर्षी समरहिलला आला आणि सतराव्या वर्षी तो शाळा सोडून गेला. या सगळ्या वर्षांमध्ये तो कोणत्याही तासाला कोणत्याच वर्गात बसला नाही. त्याला लिहिता-वाचता

येत नव्हतं. त्यामुळे त्याच्या आई-वडिलांना अर्थातच त्याची खूप काळजी वाटत होती. पण टॉम वयाच्या नवव्या वर्षी डेव्हिड कॉपरफील्ड हे पुस्तक वाचताना नीलला दिसला. त्याला वाचता कसं येतं? असं विचारल्यावर तो म्हणाला माझा मीच शिकलो. काही वर्षांनंतर दोन-पंचमांशमध्ये दोनचतुर्थांश कसे मिळवायचे हे विचारायला तो नीलकडे आला. असे अनेक विषय टॉम स्वत:च शिकला. आता धातूची उपकरणं बनवायचा टॉमचा स्वत:चा कारखाना आहे. त्याला जगातल्या अनेक विषयांचं ज्ञान आहे.

डेरिफ बॉईड हा असाच एक मुलगा. तो वयाच्या आठव्या वर्षी समरहिलमध्ये आला. तो मेडिकलची प्रवेश परीक्षा पास झाला, तेव्हा १८ वर्षांचा होता. पण मेडिकलच्या शिक्षणासाठी त्याच्या वडिलांकडे पैसे नव्हते. मग डेरिकनं स्पेनमधल्या एका बाईंकडे शोफरची नोकरी केली. त्या बाईंना युरोपमध्ये फिरवलं. त्यांच्या घराची डागडुजी करून दिली आणि नवं घर बांधायला चिक्कार मदत केली. त्या बाईंनी डेरिफच्या मेडिकलच्या शिक्षणाचा खर्च उचलला.

आज समरहिलमध्ये ५ ते १७ या वयोगटातली जगभरातून आलेली सुमारे ७५ मुलं शिकतात. शिक्षक आणि इतर कर्मचारी असे मिळून समरहिलमध्ये १०० जण आहेत. इंग्लंडमधल्या सफोक परगण्यापासून दोन मैलांवर एका व्हिक्टोरियन बंगल्यात समरहिल कार्यरत आहे. इथे मुलांना खेळायला मुभा आहे. शिकणं पर्यायी आहे. मुलांना इथे शाळेतले नेहमीचे विषय सोडून चित्रकला, गायन, वादन, नृत्य, लिखाण, अभिवाचन, लाकूडकाम, संगणक अशा कोणत्याही विषयात शिकता येतं. एखादं मूल सगळ्यांबरोबर वर्गात शिकताना अस्वस्थ होत असेल, तर त्याला एकट्याला शिकण्याची सोय आहे. काही मुलं भराभर शिकतात, काहींना वेळ लागतो. अशा सगळ्यांना त्यांच्या-त्यांच्या वेगानं इथे शिकता येतं. मुलांना हवं असेल, तरच ती परीक्षा देतात.

मुलं वर्गात न बसता बाहेर खेळू शकतील, एकमेकांशी गप्पा मारू शकतील, कलाकृती तयार करू शकतील अशा अनेक मोकळ्या जागा शाळेभोवतीच्या परिसरात आहेत. झोपडी बांधणं, झाडावर चढणं, कँपफायर असं सगळं इथे चालू असतं. इथे स्विमिंग पूल, टेनिस कोर्ट, बास्केटबॉल, टेबलटेनिस खेळायलाही मुभा आहे. हिवाळ्यात बैठे किंवा इनडोअर खेळ कोणते खेळावेत, यासाठीही समिती



निवडली जाते. तिथे शब्दकोडी, बोर्ड गेम्स, अभिनय, गोष्ट सांगणं, सिनेमा पाहणं, अभिवाचन असे उपक्रम होतात. जगभरात मुलांच्या हक्कांवर काम करणाऱ्या, वर्कशॉप्स घेणाऱ्या, समरहिल शाळा पाहायला उत्सुक असणाऱ्याच लोकांना शाळेत यायला प्रोत्साहन देण्यासाठीही इथे एक समिती आहे.

पण समरहिलचं सर्वांत महत्त्वाचं वैशिष्ट्य म्हणजे तिथल्या मीटिंग्ज. संपूर्णपणे लोकशाही तत्त्वावर चालणाऱ्या या शाळेत सगळे नियम आणि निर्णय दर आठवड्याला होणाऱ्या मीटिंगमध्ये घेतले जातात. या मीटींग्जमध्ये सगळी मुलं आणि स्टाफ एकत्र असतो. पाच वर्षांचा मुलगादेखील आपलं मत या मीटिंगमध्ये मांडतो. समरहिल फिल्ममध्ये रायन या विद्यार्थ्यानं पैसे चोरले आणि एका मुलाबरोबर मारामारी केली, असे त्याच्यावर आरोप होतात. तेव्हा सगळी मुलं एक मीटिंग घेतात. त्यात खुले आम चर्चा होऊन शिक्षा द्यायची का नाही आणि काय द्यायची, हे ठरवलं जातं. सर्वांना न्याय आणि आपलं मत मांडायला परवानगी देणाऱ्या अशा मीटिंग्ज कॉर्पोरेट जगातही कधी होताना दिसत नाहीत.

समरहिल फिल्ममध्ये मुलांनी ऑफस्टेडच्या अधिकाऱ्यांशी दिलेला लढा पाहणं हा अत्यंत सुखद प्रकार आहे. इंग्लंडमधील टोनी ब्लेअरच्या सरकारनं शिक्षणव्यवस्था सुधारायचा चंग १९९७ मध्ये बांधला. त्या प्रक्रियेनुसार शाळेचे अधिकारी शाळेत तपासणीसाठी आले होते. फिल्ममध्ये हे प्रसंग नाट्यरूपाने दाखवले आहेत. या अधिकाऱ्यांचे मुलं आणि शिक्षक यांच्याबरोबरचे संवाद प्रत्यक्ष ऐकायला हवेत. उदाहरणार्थ– त्यातला एक अधिकारी म्हणतो, ''या शाळेत नॉर्मल एज्युकेशन दिलं जात नाही, असं आमचं मत आहे.'' त्यावर समरहिल शाळेची मुख्याध्यापिका म्हणते– नॉर्मल एज्युकेशन म्हणजे काय, यावर ते अवलंबून आहे.

ऑफस्टेडच्या अधिकाऱ्यांनी समरहिल शाळेत वर्गात बसणं अनिवार्य नाही, या कारणानं शाळेविरुद्ध तक्रार नोंदवली. या तक्रारीविरोधात शाळा कोर्टात गेली. हा खटला चालल्यानंतर ब्रिटिश कोर्टानं शाळा सुरू ठेवायची असेल, तर शाळेची वारंवार तपासणी होण्याबाबत काही अटी घातल्या. त्या अटी शाळेने मान्य करायच्या का नाही, यावर समरहिलच्या मुलांनी कोर्टात न्यायाधीशांच्या खुर्चीवर बसून एक मीटिंग घेतली. अर्थात मुलांनी कोर्टात अशी मीटिंग घेणं हे इंग्लडमध्ये प्रथमच घडत होतं. हा प्रसंग फिल्ममध्ये नाट्यमय पद्धतीत बघतानाही आपण हरखून जातो. लोकशाही तत्त्वं म्हणजे काय, याचा हा प्रसंग वस्तुपाठ आहे.

हा खटला शाळेनं जिंकला. यातून समरहिल ही शिक्षणसंस्था वाचली; इतकेच नव्हे, तर शाळा ज्या तत्त्वांवर उभी होती, ती तत्त्वं महत्त्वाची आहेत हे सिद्ध झालं.

फिल्ममध्ये या खटल्यात मॅडी उत्साहात भाग घेते. तिला तिचे आई-वडील पहिलं सत्र संपल्यावर न्यायला येतात. मॅडीला मात्र समरहिलमध्येच राहायचं असतं. तेव्हाच समरहिलमध्ये एका ठिकाणी आग लागते. आगीत एक लहान मुलगा अडकतो. आग कोणी आणि का लावली, यावर बरेच आरोप-प्रत्यारोप होतात. त्यावरही मीटिंग घेऊन मुलं ते प्रकरण शांतपणे सोडवतात. मॅडीची आई या सगळ्या प्रकाराला साक्षीदार असते. शेवटी ती मॅडीला समरहिलमध्ये ठेवताना म्हणते, ''मला खूप नीटनेटकं, शिस्तीचं, आखीव-रेखीव आयुष्य आवडतं. मला गोष्टींवर माझं नियंत्रण असावं, असं वाटतं. मी अशी शिस्तप्रिय व्यक्ती आहे, हे मला माहिती आहे. पण तुझं व्यक्तिमत्त्व कशा प्रकारचं आहे, हे तुला अजून माहिती नाही.. ते तू शोध!''

कोरोना व्हायरसच्या साथीच्या काळात शिक्षणाबाबत एक गोष्ट प्रामुख्यानं लक्षात आली आहे. ती म्हणजे, आपण सगळ्यांनी घेतलेलं शिक्षण कोरोनानंतरच्या काळात रोजगार कमवायला उपयोगी पडेलच असं नाही. आपल्यातल्या वेगळ्या क्षमता, कौशल्यं जाणून घेऊन ती जोपासली, तर वेगवेगळ्या क्षेत्रांत नोकरीच्या संधी उपलब्ध आहेत. आपल्या मुलांनाही अशा वेगळ्या, त्यांच्या आवडीच्या वाटांनी जाऊन आयुष्य जगायची, त्यांचं व्यक्तिमत्त्व स्वत: शोधायची मुभा द्या. त्यांच्या इच्छा-आकांक्षांना बांध घालून त्यांना थांबवण्यापेक्षा 'थांबता ना थांबती वादळे रक्तातली', हे लक्षात घ्या!

समरहिल फिल्मची युट्यूब लिंक https://www.youtube.com/watch?v=TxngqMavda0

थांबता ना थांबती वादळे रक्तातली– ही ओळ सुधीर मोघे यांची आहे.

**नीलांबरी जोशी**
neelambari.joshi@gmail.com
Mob. 9922445456

## नवे पुस्तक

हरिहर कुंभोजकर

# स्वार्थातून सर्वार्थाकडे

आज भारत संक्रमणाच्या स्थितीत आहे. अर्थात आजही काही मंडळी गांधीजींच्या प्रभावाखाली स्वयंपूर्ण ग्रामराज्याची मागणी करतात. काही नेहरूजींच्या प्रेमामुळे शासनाच्या मालकीचे मोठे औद्योगिक प्रकल्प आणि त्यासाठी शासनाचा आर्थिक क्षेत्रात वाढता हस्तक्षेप स्वीकारून समाजवादाकडे ओढले जातात. कधी आंधळ्या राष्ट्रवाद्यांना सांभाळून घेण्यासाठी राजकारण्यांना स्वदेशीचा पुकारा करावा लागतो. कधी आंतराष्ट्रीय दबावाखाली आपण ग्लोबलायझेशन स्वीकारतो, तर कधी निवडून येण्यासाठी खैरात वाटतो. या सगळ्या प्रकारात अर्थशास्त्र हे शास्त्र आहे, विसरून जातो. कोणत्याही शास्त्राचे काही नियम असतात. अर्थशास्त्र हे भौतिकशास्त्राइतके परिपूर्ण नाही, हे खरे आहे. तरीही त्याचे नियम पाळले नाहीत, तर त्याची किंमत द्यावीच लागते आणि मग साऱ्या देशाला गंभीर परिणामाला सामोरे जावे लागते.

‘सुईच्या नेढ्यातून उंट जाईल, पण स्वर्गाच्या दारातून धनवान जाऊ शकणार नाही’, असे बायबल सांगते. ‘पैसे मिळवणे पाप आहे‘ असा उपदेश धर्माचार्य करतात, तर ‘सगळे पैसेवाले चोर आहेत,’ असे धर्माला अफू मानणारे सांगतात. त्यातच माणसाची राहणी साधी व विचारसरणी उच्च असावी, ऋण काढून सण साजरा करू नये, अंथरूण बघून पाय पसरावेत, लुळ्या-पांगळ्या श्रीमंतीपेक्षा धट्टीकट्टी गरिबी बरी- असल्या उपदेशावर महाराष्ट्रातील मध्यमवर्ग पोसलेला. त्यामुळे ‘स्वार्थातून सर्वार्थाकडे’ हे पुस्तक एखाद्या स्वामीजींचा निवृत्तिपर आध्यमिक प्रवचनांचा संग्रह असावा, असे सकृत्दर्शनी वाटण्याची शक्यता आहे. या पुस्तकाचा परमार्थाशी अर्था-अर्थी काहीही संबंध नाही, त्याचा संबंध अर्थाशी म्हणजे पैशांशी आहे. हे पुस्तक वाचल्यावर वरील मध्यमवर्गीय विचार वास्तवापासून किती दूर आहेत, हेच कळून येईल. चार्ल्स व्हीलनच्या ‘नेकेड इकॉनॉमिक्स’ या जगप्रसिद्ध पुस्तकाचा हा मराठी अनुवाद आहे. लेखक अमेरिकेतील नॉर्थ वेस्टर्न विद्यापीठात अध्यापन करतात आणि लंडनच्या ‘इकॉनॉमिस्ट’साठी लेख लिहीत असतात. अशा प्रकारे लेखक-पत्रकार व प्राध्यापक दोन्ही असल्याने पुस्तक माहितीपूर्ण आणि सुबोध झाले आहे. मूळ पुस्तक २००२ मध्ये प्रसिद्ध झाले. या पुस्तकाची, आत्तापर्यंत जगातल्या बावीस भाषांमध्ये भाषांतरे झाली होती. नुकतेच डॉ.अजय ब्रह्मनाळकरांनी मराठीत तेविसाव्या भाषेत भाषांतर केले. या पुस्तकातले अर्थशास्त्र ‘नेकेड’ म्हणजे उघडे-नागडे का? तर, ‘हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम्।’ भौतिक सत्याचे मुख सत्तेचे ठेकेदार सुवर्णपात्राने झाकून टाकतात. हे सुवर्णपात्र कधी अध्यात्माचे असते, तर कधी कुठल्या ‘इझम’ असते आणि कधी कधी तर चक्क मानवतेचे नाव सांगत येते. हे सोन्याचे झाकण फेकून देऊन अर्थशास्त्रीय सत्याचे उघडे-नागडे रूप लोकांच्या समोर मांडण्याचे काम लेखक करतो. अर्थशास्त्राच्या पुस्तकातील दोन ओळींमध्ये दडलेली, सामान्य वाचकाला सहज वाचता न येणारी अदृश्य ओळ या पुस्तकात अतिशय सोप्या भाषेत वाचून दाखवण्याचे काम केले आहे. अर्थकारण आणि राजकारण






यांचा जवळचा संबंध आहे. जी.ए. कुलकर्ण्यांच्या कथेतील 'विदूषक' एके ठिकाणी म्हणतो, 'राजकारण आणि महाभारत यामध्ये एक अत्यंत लक्षणीय अंतर आहे... राजकारणात धर्मराज वस्त्रहरण करून सत्य स्वरूप दाखवण्याचा प्रयत्न करतात, तर सत्ताधारी दुःशासन भरजरी वस्त्रे टाकून डोळे दिपवीत स्वतःची लाज राखतात.' चार्ल्स व्हीलन येथे धर्मराजाची भूमिका बजावतात. ऐंशीच्या दशकाच्या अंतापर्यंत आपण समाजवाद, लोककल्याणकारी राज्य इत्यादी शब्दांच्या 'भरजरी वस्त्रां'च्या आवरणाखाली केवळ भ्रष्टाचार, अकार्यक्षमता आणि दारिद्र्यच जोपासत राहिलो. हा अपघात नव्हता. आमचे सुरुवातीचे शीर्षस्थ नेते शुद्ध चारित्र्याचे होते, त्यागी होते, प्रामाणिक होते. पण माणसाच्या स्खलनशीलतेचा विचार त्यांनी पुरेसा केला नव्हता. परिणामी, रोजचा खर्च भागवण्यासाठी सोने गहाण ठेवण्याची वेळ देशावर आली होती. नव्वदीच्या दशकात आंतरराष्ट्रीय दबावाखाली आम्हाला समाजवादाचा बुरखा फेकून देऊन वास्तवाला सामोरे जावे लागले. ते आवरण दूर करण्यामागची अर्थशास्त्रीय भूमिका काय होती, सोव्हिएत युनियनचे विघटन का झाले, चीनने माओला दुरूनच नमस्कार का केला.–या आणि अशा अनेक प्रश्नांची उकल हे पुस्तक वाचल्याने होते. या पुस्तकातले अर्थशास्त्र आणखीही एका अर्थाने नग्न आहे. अर्थशास्त्रीय सिद्धांत खूपदा तक्ते, आकृत्या, आलेख, कोष्टके, समीकरणे इत्यादींनी झाकलेले असतात. सिद्धांत नेमक्या शब्दांत सांगण्यासाठी तसे करणे आवश्यक असते. पण हाच नेमकेपणा बऱ्याच वेळा, सामान्य वाचकाच्या बाबतीत विचार समजण्याच्या आड येतो. म्हणून ही आवरणे काढून टाकून, या पुस्तकात, सर्वसामान्य लोकांना समजेल अशा भाषेत आजूबाजूला रोज घडणाऱ्या गोष्टींचे विश्लेषण केले आहे. डॉ.ब्रह्मनाळकर धन्वंतरी आहेत, अर्थशास्त्रातले डॉक्टरेट नाहीत, तरीही ते या पुस्तकाच्या प्रेमात पडले आणि त्यांना त्याचे भाषांतर करावेसे वाटले, हा या पुस्तकाच्या सुबोधतेचा पुरावा.

पुस्तकाच्या चारशे पानांत विकासाचे अर्थशास्त्र, व्यापार आणि जागतिकीकरण, आंतरराष्ट्रीय अर्थकारण, रिझर्व्ह बँक, आर्थिक प्रगतीचे निकष, संघटित सौदाशक्ती, मानवी भांडवल, माहितीचे अर्थशास्त्र, शासन आणि अर्थव्यवस्थेचे नाते, इत्यादी आपल्या रोजच्या जीवनावर परिणाम करणाऱ्या पण आपण अनभिज्ञ असलेल्या अर्थशास्त्राच्या विविध पैलूंवर प्रकाश टाकणारी तेरा प्रकरणे आहेत. पुस्तकाच्या सुरुवातीला अनुवादकाचे मनोगत आणि मूळ

लेखकाची प्रस्तावना आहे. दोन्हीही स्वतंत्र लेख म्हणून वाचनीय आहेत. प्रकरणाच्या सुरुवातीला उणीपुरी पानभर होईल अशी अनुवादकाची प्रस्तावना पुस्तकाचे वैशिष्ट्य ठरावे. त्यामुळे जिज्ञासू पण काहीशा अनभिज्ञ वाचकांना विषय समजणे सोपे होते. शिवाय या प्रस्तावनेमुळे मराठी वाचक अमेरिकन लेखकाशी जोडला जातो.

सर्वसामान्यांच्या समजुतींना धक्का देणारे अनेक किस्से या पुस्तकात विखुरले आहेत. लेखक अमेरिकन असल्याने व त्यांच्यापुढील अपेक्षित वाचकवर्ग जागतिक असल्याने पुस्तकात भारतीय संदर्भ असलेली उदाहरणे फार कमी आहेत. पण, अशा निवडक किश्श्यांपैकी एक किस्सा– भारत १९९१ मध्ये दिवाळखोरीच्या कड्यापर्यंत का येऊन ठेपला याची झलक दाखवतो. जेव्हा समाजवादाचा डंका जगभर ऐकू येत होता आणि अल्पकाळ चाललेल्या जनता पक्षाचा पराभव करून इंदिरा गांधी पुन्हा भारताच्या पंतप्रधान झाल्या होत्या, त्या काळातली गोष्ट. हिंदुस्थान फर्टिलायझर कॉर्पोरेशनचा कारखाना पश्चिम बंगालमध्ये १९८० मध्ये सुरू(?) झाला. बाराशे कामगार खत निर्माण करण्यासाठी रोज कामावर येत होते. एक किरकोळ गडबड झाली होती. खताचे स्थिर रसायन तयार होत नव्हते. त्यामुळे खताचा एक दाणाही तयार होत नव्हता. पण कामगारांचे पगार वेळेवर होत. विशिष्ट काळानंतर कामगारांना बढत्याही मिळत होत्या, बोनसही मिळे, तो त्यांचा अधिकारच होता. एक दिवसही उत्पादन न करता, बाराशे कर्मचारी असलेला हा खत कारखाना एक–दोन नव्हे, तब्बल बारा वर्षे चालू होता. कारण फॅक्टरी ॲक्टप्रमाणे कारखाने बंद करता येत नव्हते.

याउलट अमेरिकेतील उदाहरण. तिथे बर्गर किंगच्या प्रवेशद्वारात तुम्हाला पाटी दिसेल– तुम्हाला रोख–पावती मिळाली का? नसल्यास तुमचे आजचे जेवण फुकट. पैसे परत घेण्यासाठी मॅनेजरला भेटा. भारतीयांना आश्चर्य वाटण्यासारखीच ही सूचना आहे. मालकाने काही अन्नछत्र उघडले नव्हते. पण एकदा त्याच्या लक्षात आले की, काही कर्मचारी गिऱ्हाइकांना जेवण देतात आणि पावती न देता परस्पर पैसे आपल्या खिशात टाकतात. मालकाचे तसेही नुकसान होणारच असते. पण आता जेवण फुकट मिळते यासाठी गिऱ्हाईक मॅनेजरकडे येते आणि चोर सापडतो.

आज भारत संक्रमणाच्या स्थितीत आहे. अर्थात आजही काही मंडळी गांधीजींच्या प्रभावाखाली स्वयंपूर्ण ग्रामराज्याची मागणी करतात. काही नेहरूजींच्या प्रेमामुळे शासनाच्या मालकीचे मोठे औद्योगिक प्रकल्प आणि त्यासाठी शासनाचा आर्थिक क्षेत्रात वाढता हस्तक्षेप स्वीकारून समाजवादाकडे ओढले जातात. कधी आंधळ्या राष्ट्रवाद्यांना सांभाळून घेण्यासाठी राजकारण्यांना स्वदेशीचा पुकारा करावा लागतो. कधी आंतराष्ट्रीय दबावाखाली आपण ग्लोबलायझेशन स्वीकारतो, तर कधी निवडून येण्यासाठी खैरात वाटतो. या सगळ्या प्रकारात अर्थशास्त्र हे शास्त्र आहे, विसरून जातो. कोणत्याही शास्त्राचे काही नियम असतात. अर्थशास्त्र हे भौतिकशास्त्राइतके परिपूर्ण नाही, हे खरे आहे. तरीही त्याचे नियम पाळले नाहीत, तर त्याची किंमत द्यावीच लागते आणि मग साऱ्या देशाला गंभीर परिणामाला सामोरे जावे लागते. सामान्य माणसाला हे ठाऊक नसते किंवा क्षणिक फायद्यासाठी दूरगामी फायद्याकडे तो दुर्लक्ष करतो. मग देशासाठी तोट्याचे ठरणारे आर्थिक धोरण निवडणुकीच्या राजकारणात लाभदायक दिसू लागते. त्याचा गैरफायदा लबाड राजकारणी उठवतात. त्याचे दीर्घकालीन दुष्परिणाम साऱ्यांनाच भोगावे लागतात. प्रस्तुत पुस्तक वाचकाला अर्थसाक्षर करते आणि सुजाण नागरिकांना अशा दुष्परिणामांपासून सावध करते. निकोप लोकशाहीसाठी अशा पुस्तकांची नितांत गरज आहे. त्यामुळे या पुस्तकाच्या भाषांतरासाठी डॉ.ब्रह्मनाळकर अभिनंदनास पात्र आहेत.

**हरिहर कुंभोजकर,** कोल्हापूर
hvk_maths@yahoo.co.in

**स्वार्थातून सर्वार्थाकडे**
'नेकेड इकॉनॉमिक्स' या जगप्रसिद्ध पुस्तकाचा अनुवाद
चार्ल्स व्हीलन
अनुवाद : डॉ. अजय ब्रह्मनाळकर
राजहंस प्रकाशन, पुणे
पृष्ठे ४००, किंमत : ४०० रुपये

# साधना साप्ताहिकाचे
# डिजिटल अर्काइव्ह
weeklysadhana.in/archive

## पहिल्या टप्प्यातील पूर्वार्ध कार्यान्वित झाला...

७२ वर्षांची परंपरा असलेल्या साधना साप्ताहिकाच्या 'डिजिटल आर्काइव्ह'चा पहिला टप्पा हीरकमहोत्सवानंतरच्या बारा वर्षांचा (२००८ ते २०२०) आहे,
त्यातील अलीकडच्या सहा वर्षांचे सर्व अंक या अर्काइव्हवर उपलब्ध आहेत... कसे?

१. अलीकडच्या सहा वर्षांतील म्हणजे २०१४ ते २०२० या काळातील सर्व म्हणजे ३०० अंक pdf स्वरूपात जसेच्या तसे पाहता/वाचता येतील.

२. या ३०० अंकांत मिळून अडीच हजारांपेक्षा अधिक लेख आहेत, ते सर्व युनिकोड मध्येही उपलब्ध आहेत.

३. हे सर्व अडीच हजार लेख, लेखकांच्या नावानुसार उपलब्ध आहेत, म्हणजे प्रत्येक लेखकाचे लेख एकत्रितपणे इथे वाचता येतील.

४. हे सर्व अडीच हजार लेख विषयानुसार उपलब्ध आहेत. उदा. राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक, आर्थिक, साहित्यविषयक.

५. हे सर्व अडीच हजार लेख लेखनप्रकारानुसार उपलब्ध आहेत. उदा. संपादकीय, मुलाखत, दीर्घ लेख, प्रतिसाद.

६. हे सर्व अडीच हजार लेख आणि ३०० अंकांच्या pdf डाऊनलोड करता येतात, email वा whats app द्वारे पाठवता येतात.

७. सध्या हे सर्व अंक व सर्व लेख विनामूल्य उपलब्ध आहेत..

(या आधीच्या सहा वर्षांचे म्हणजे २००८ ते २०१३ या काळातील सर्व ३०० अंक वरीलप्रमाणेच उपलब्ध करून देत आहोत, १५ ऑगस्ट २०२० रोजी.)

संपर्क **साधना साप्ताहिक / डिजिटल अर्काइव्ह**

४३१, शनिवार पेठ, पुणे ४११०३० weeklysadhana@gmail.com | Ph. 02024451724 | Mob.9545005138

**साधना साप्ताहिक :**
२७ जून २०२०

**Registered** Licence to Post Without Prepayment of Postage No. WPP- 6 /31-12-2020
एन.डी.नं.आर.एन.आय.१६०१/५७ Postal Registration No. PCW/080/2018-2020
Posted at PUNE PSO GPO 411001 / EveryThursday, Date of Posting : 20-6-2020 / Date of Publication : 20-6-2020